# Life of St. Anthony of Padua

(A Purana in Marathi verse published in 1659)

Composed by

**Fr. Antonio de Saldanha** S. J.

(1598-1663)

**Transliterated from the Roman script and edited with notes and Introduction**

**By**

**Anant Kakba Priolkar**

[Director, Marathi Post-graduate Research Institute]



With a Foreword by

The Rt. Rev. **Dr. Andrew de Souza**

Bishop of Poona



**MARATHI SANSHODHANA MANDALA**

Mumbai Marathi Granthasangrahalaya, Thakurdwar Bombay 2.

1956

## FOREWORD

Research of any kind is in itself a laborious task, taxing one's powers, patience and even the pocket. But to devote one's life to research into the foundations of just a regional language, digging into the past of centuries, is far above the ordinary ideal. In our particular case, the author needs the knowledge not only of the local and surrounding dialects and tongues, but also of foreign languages because of the aliens that ruled our country. Now, to be sufficiently acquainted with all these, is certainly a remarkable feat. Prof. Priolkar then, richly deserves our admiration and congratulations, but what I admire most in his work, is, all that he has brought to light on the Christian literature of Maharashtra going down the period of not less than four centuries. It is but natural that foreigners laid the foundations of the Christian classics, but it has been unnatural that the subsequent generations of Christians did next to nothing in that sphere; nay, generations have come and gone, mostly ignorant of the beauties in the treasures of their past.

Hence, Prof. Priolkar has done and will do singular service to the Christian community by his studies and publications of their Puranas and other ancient publications of Konkan. Though all scholars may not swear by him on our past history, or accept his opinions on Christianity and its beliefs, one cannot but propose his life and labours in the wonderful field of research, for emulation by especially the highly gifted youths of our country.

Finally, I heartily wish all prosperity to the Marathi Research Institute in its labours, without any distinction of religion or race.

5-10-55
Bishop's House,
Poona.

+ **Andrew D'Souza**
BISHOP OF POONA

# पुरस्कार

कोणत्याहि प्रकारचें संशोधन म्हटलें तरी त्यामध्यें अतिशय परिश्रम घ्यावे लागतात. या कामांत केवळ बुद्धीस शीण येतो एवढेंच नव्हे तर मनुष्याची चिकाटीहि कसोटीला लागते. एकाद्या प्रादेशिक भाषेच्या संशोधनकार्याकडे स्वतःस वाहून घेणें व त्या भाषेच्या अनेक शतकांतील इतिहासाची छाननी करणें ही कामगिरी तर सामान्य संशोधनापेक्षां कितीतरी उच्च दर्जाची म्हटली पाहिजे. विशेषतः प्रस्तुत संशोधनाचे बाबतींत लेखकाला केवळ आजूबाजूच्या स्थानिक ग्रांथिक भाषांचें व बोलभाषांचें उत्तम ज्ञान तर आवश्यक आहे; पण परकीयांनीं आपल्या देशावर राज्य केलें असल्यामुळें त्या परकीयांच्या भाषेवरहि प्रभुत्व असणें अत्यावश्यक आहे. आतां ह्या सर्व भाषांचें चांगलें ज्ञान असणें ही निःसंशय उल्लेखनीय गोष्ट आहे. म्हणून प्रा. प्रियोळकर हे स्तुतीस आणि अभिनंदनास पात्र आहेत ही गोष्ट तर खरीच, परंतु त्यांच्या ग्रंथांतील एक गोष्ट मला अत्यंत प्रशंसनीय वाटते. ती म्हणजे कमींत कमी गेल्या चार शतकांत निर्माण झालेल्या महाराष्ट्रांतील ख्रिस्ती वाङ्मयासंबंधीं कितीतरी अज्ञात भाग त्यांनीं उजेडांत आणला आहे. परकीयांनीं ख्रिस्ती पौराणिक वाङ्मयाचा पाया घातला यांत आश्चर्य नाहीं. परंतु त्यानंतरच्या पिढ्यांतील ख्रिस्ती लोकांनीं या वाङ्मयाच्या बाबतींत जवळजवळ कांहीं केलें नाहीं, ही गोष्ट अगदीं अस्वाभाविक वाटते. इतकेंच नव्हे तर येथें ख्रिस्ती लोकांच्या अनेक पिढ्या होऊन गेल्या, परंतु त्यांना आपल्या ह्या प्राचीन साहित्यांतील ऐश्वर्याचें जवळजवळ अज्ञानच होतें.

म्हणून ख्रिस्ती समाजाच्या पुराणांचा व कोंकणांतील इतर प्राचीन ग्रंथांचा अभ्यास करून व त्यासंबंधीं ग्रंथ प्रकाशित करून प्रा. प्रियोळकरांनीं ह्या समाजाची फार मोठी सेवा केली आहे व यापुढेंहि हें त्यांचें कार्य चालूच रहाणार आहे. जरी सर्वच्या सर्व विद्वानांनीं आपल्या प्राचीन इतिहासाचे बाबतींत त्यांचा शब्द अखेरचा मानला नाहीं अथवा ख्रिस्ती धर्म आणि त्यांतील तत्त्वें यांविषयीं त्यांनीं व्यक्त केलेलीं मतें ग्राह्य मानलीं नाहींत, तरी आपल्या देशांतील विशेष करून अत्यंत बुद्धिमान् तरुणांनीं त्यांचें चरित्र व संशोधनाच्या क्षेत्रांत त्यांनीं घेतलेले अलौकिक परिश्रम हे आपल्या डोळ्यासमोर आदर्श म्हणून

ठेवावे, असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं. शेवटीं धर्म, पंथ व वंश असा कोणताहि भेदभाव न बाळगतां मराठी भाषेचें उपयुक्त संशोधनकार्य चालविणाऱ्या मराठी संशोधनमंडळ या संस्थेचा मी अन्तःकरणपूर्वक उत्कर्ष इच्छितों.

बिशप हाऊस, पुणें–१ + अँद्रु द सौझा

दि. ५–१०–'५५ (पुण्याचे बिशप)

---

# आभार

आमच्या विनंतीस मान देऊन पुण्याच्या पूज्य बिशपस्वामींनीं ते रोमला जाण्याच्या विलक्षण गर्दींत असतांही या ग्रंथाला मराठींत 'पुरस्कार' लिहून दिला, याबद्दल त्यांचे आम्हीं अत्यंत कृतज्ञ आहोंत.

गोव्यांतील नवख्रिश्चनांच्या आग्रहावरून सतराव्या शतकांत परकीय पाद्रींनीं मराठींत अनेक ख्रिस्ती पुराणें लिहिलीं. परंतु त्यांच्या वंशजांपैकीं हे मराठी ग्रंथ वाचूं शकणारीं चारदोन देखील माणसें आज असतील कीं काय, याबद्दल आम्हांस शंका आहे. स्वतः बिशपस्वामी गोवेकर असूनसुद्धां मराठी चांगलें जाणतात. त्यांनीं आपल्या प्रांतबांधवांचें या आपल्या मराठी वाङ्मयवैभवाकडे लक्ष वेधिलें, ही समाधानाची गोष्ट होय. मराठी न जाणणाऱ्या बांधवांचेंही या त्यांच्या 'पुरस्कारा' कडे लक्ष जावें म्हणून त्यांच्याचकडून तो इंग्रजींत लिहून घेऊन सोबत जोडण्यांत येत आहे.

या ख्रिस्ती मराठी वाङ्मयाच्या निर्मितीमागचा सोळाव्यासतराव्या शतकांतील इतिहास सर्वसाधारण ख्रिस्ती माणसाला पटेल किंवा रुचेल अशी आमची अपेक्षा नाहीं. तो अप्रिय असला तरी साधार व म्हणूनच आमच्या समजाप्रमाणें सत्य आहे, आणि तो शक्य तितक्या सौम्य शब्दांत कथन करण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे एवढेंच आम्ही येथें सांगूं शकतों.

—संपादक

पाद्री आंतोनियु द सालदाञ
विरचित

# सांतु आंतोनिची जीवित्वकथा

( सतराव्या शतकांतील क्रिस्ती पुराण )



संपादक
अनंत काकबा प्रियोळकर
डायरेक्टर, मराठी संशोधनमंडळ, मुंबई




मराठी संशोधनमंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २

१९५४

किंमत २ रुपये

# मराठी संशोधनमंडळांत तयार झालेलीं पुस्तकें

१ **मराठी दोलामुद्रितें.** किं. १–०–०

**मुक्तेश्वरकृत महाभारत** ( संशोधित प्रत )

२ आदिपर्व, खं. १ ला, १ ते १२ अध्याय. किं. ५–०–०

३ आदिपर्व, खं. २ रा, १३ ते २५ अध्याय. किं. ५–०–०
( दोनही खंडांत मुक्तेश्वराच्या चरित्रविषयक प्रास्ताविक निबंध आहेत. )

४ **Shalapaddhati** ( १८२४ सालीं मूळ मराठींत लिहिलेल्या, परंतु आज अनुपलब्ध असलेल्या पुस्तकाचें त्याच सालीं झालेलें गुजराती भाषांतर. विस्तृत इंग्रजी प्रस्तावनेसह. ) किं. १–८–०

या पुस्तकासंबंधीं गुजरात विद्यापीठाचे कुलगुरु न्या. सर दिवेटिया लिहितात,

"I have read it with great interest and I was agreeably surprised to see the Indian traditional system of teaching in Primary schools was adopted in England through Dr. Bell. You have done a great service by publishing this pamphlet and I wish it is widely known and appreciated by people."

हैद्राबादचे माजी शिक्षणमंत्री श्री. देवीसिंग चव्हाण लिहितात,

"Your paper on Shalapaddhati I find exceedingly interesting. You have expounded to the world, how India led the way for others to follow even in methods of education as in many other spheres for which I congratulate you."

५ **मराठींतील आरंभींच्या क्रिस्ती ग्रंथिनी** ( सोळाव्या व सतराव्या शतकांत क्रिस्ती मिशनऱ्यांनीं लिहिलेल्या मराठी बोलींतील प्रश्नोत्तररूप धार्मिक पुस्तकांची माहिती ). किं. १–०–०

६ **सांतु आंतोनिची जीवित्वकथा** ( क्रिस्ती पुराण ). किं. २–०–०

---

प्रकाशक व मुद्रक : प्रा अ. का. प्रियोळकर,
मराठी संशोधनमंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाकुरद्वार, मुंबई २
मुद्रणस्थळ : साधना प्रेस, आर्थर रोड, मुंबई ११

# सांतु आंतोनिची जीवित्वकथा

## प्रस्तावना

'सांतु आंतोनिची जीवित्वकथा' या प्रस्तुत ओवीबद्ध मराठी काव्याचा कर्ता पाद्री आंतोनियु द सालदाञ्ज याचा जन्म माझागांव नांवाच्या आफ्रिकेंतील किल्ल्यांत झाला. मारोको हें त्याचें जन्मस्थान असल्याचें त्याच्या मुद्रित ग्रंथावर नमूद आहे तो हाच भाग असावा. त्याचा बाप पोर्तुगीज व आई इटालियन होती. आपल्या अंगांतील वीरवृत्तीला आपली जन्मभूमी हें कार्यक्षेत्र अपुरें वाटून वयाच्या सोळाव्या वर्षी लष्करी पेशा पत्करून तो हिंदुस्थानांत आला; परंतु इकडे गोव्यांत आल्यावर त्याची वृत्ति बदलली. त्यानें शिपाईगिरीचा त्याग करून स्वतःला धर्मकार्याला वाहून घेण्याचें ठरविलें, आणि १६१५ सालीं जेजुईट मंडळीमध्यें (Companhia de Jesus) तो सामील झाला. या ठिकाणीं पूर्वाभ्यास झाल्यावर तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाला त्यानें सुरुवात केली. पुढें कांहीं काळ आजारीपणात काढल्यावर सासष्टी मिशनमध्यें धर्मोपदेशक म्हणून वरिष्ठांकडून त्याची नेमणूक झाली.

प्रथम १५४१ च्या सुमाराम ज्यावेळीं पोर्तुगीजांनीं देशी लोकांना क्रिस्ती धर्मांत आणण्याचें कार्य सुरू केलें, त्यावेळीं त्यांचा भर धाकदपटशा, फुसलावणी किंवा बळजबरी यांच्यावरच होता. अशा प्रकारानें हजारो लोक जरी क्रिस्ती धर्मांत ओढले गेले तरी ते केवळ नांवानेंच क्रिस्ती असत. घरांत ते जुन्या हिंदु पद्धतीप्रमाणें चालत, हिंदु धार्मिक ग्रंथ वाचीत व हिंदु देवदेवतांचें भजनपूजन करीत. नव्या क्रिस्ती धर्माचें त्यांना ज्ञान मुळींच नसे. या प्रकाराला आळा घालण्याकरितां १५६० सालीं गोव्यांत स्थापन झालेल्या इंक्विझिशनचा उपयोग करण्यात येऊं लागला. इंक्विझिशनच्या नियमांप्रमाणें जुन्या धर्माचे ग्रंथ वाचणें किंवा ते संग्रहीं ठेवणें आणि जुन्या धर्माच्या चालीरीतींप्रमाणें वागणें हा गुन्हा होता.

अशा गुन्हेगारांवर खटले भरून इंक्विझिशन त्यांना कैद करी, त्यांच्या मालमत्तेवर जप्ती आणी आणि कमाल शिक्षा म्हणून 'Auto de Fe' नांवाच्या समारंभांत त्यांना जीवंतही जाळी. उत्तर कोकणांतील मराठी बोलीचें एक क्रिस्ती पुराण उपलब्ध आहे, त्याच्यामध्यें यासंबंधी पुष्कळ निर्देश आढळतात. उदाहरणार्थ—

**कैसे क्रिस्तावांदो तुमी, पुंजीता देव लाडके,**
**असून धोंड्यामातीचे, तुमचे घरीं.**

\+ \+ \+

मुराद क्रिस्तांव असुनसीं, पातीस नइं देत सुदेचारासीं,
आणि पुंजितान हिंदुवांचे देव, आपुले घरीं.
ही वारता नइं झुटी, ऐसे करणींतो जाणा तुमी,
वरसाचे वरस गोव्यां जातान, जे हिंदुवांचे देव मानितान.

ज्यांच्यावर हिंदु देवदेवता पूजल्याचा आरोप असे, असे दमण, दीव, वसई, मुंबई वगैरे भागांतील क्रिस्ती लोक पकडून ठेवीत व दरवर्षी इंक्विझिशनपुढें उभे करण्याकरितां त्यांना गोव्याला पाठविलें जाई, त्यांचा निर्देश वरील उताऱ्यांत आहे.

सतराव्या शतकांतील इंक्विझिशनचा एक कैदी डॉ. देलों या फ्रेञ्च डॉक्टरनें आपल्या तुरुंगवासाचा जो वृत्तांत प्रसिद्ध केला आहे त्यांत आपणास दमणहून गोव्याला नेतांना वसईच्या तुरुंगांत कांहीं काळ मुक्काम करावा लागला व तेथें आपणांस पुष्कळ समदुःखी सोबती आढळले; त्यांची गोव्याला रवानगी करण्याकरितां इंक्विझिशनच्या स्थानिक अधिकाऱ्यानें कैद केलें होतें, असें लिहून ठेविलें आहे. ( प्रकरण १३ ) इंक्विझिशनच्या या धाकानेंही ज्यावेळीं या प्रकाराला आळा पडेना, त्यावेळीं या नवक्रिश्चनांना क्रिस्ती धर्माचें प्रथम शिक्षण मिळालें पाहिजे, या गोष्टीकडे धर्माधिकाऱ्यांचें विशेष लक्ष गेलें.

१५६७ सालीं जी धर्माधिकाऱ्यांची पहिली परिषद भरली होती, तिच्यामध्ये नवक्रिश्चनांना क्रिस्ती धर्मोपदेशाला हजर राहाणें आवश्यकच ठरविण्यांत आलें व हे धर्मोपदेशक जर लोकांची भाषा जाणणारे असतील तरच हा उपदेश जास्त फलदायी होईल, म्हणून धर्मोपदेशकांनीं लोकांची भाषा शिकावी, अशी जोराची शिफारस करण्यांत आली. १५७५, १५८५ व १५९२ सालीं झालेल्या, अनुक्रमें दुसरी, तिसरी व चौथी या परिषदांमध्येंही देशी भाषेच्या ज्ञानावर फार जोर देण्यांत आलेला दिसतो. १६०५ सालच्या पांचव्या परिषदेमध्यें तर पुढीलप्रमाणें ठराव करण्यांत आला : " लोकांच्या आत्म्यांच्या हिताकरितां चर्चांची व्यवस्था नीट चालावी, गांवकऱ्यांना योग्यप्रकारें धर्मशिक्षण मिळावें आणि धर्मसंस्कार यथाविधि पार पडावे म्हणून ही धर्मपरिषद अशी सक्त आज्ञा करिते कीं, कोणत्याही धर्मोपदेशकाची, त्याला गांवकऱ्यांची भाषा अवगत असल्याखेरीज गांवच्या चर्चांतील व्हायकरच्या वरिष्ठ जागेवर बढती होऊं नये; त्याची देशीभाषेंत आधीं परीक्षा घेण्यांत यावी. जे पाद्री यापूर्वीच अशा जागांवर काम करीत असतील, त्यांना जर लोकांची भाषा येत नसेल तर हा हुकूम प्रसिद्ध झाल्या दिवसापासून सहा महिन्यांचा अवधि त्यांना ती शिकण्याकरितां देण्यांत येत आहे; या मुदतींत जर त्यांनीं देशभाषेचा अभ्यास केला नाहीं तर ते आपोआपच त्या अधिकारापासून पदच्युत होतील आणि गांवकऱ्यांवर त्यांची धार्मिक हुकमत राहाणार नाहीं. "

वरील हकीगतीवरून त्या काळीं परदेशी पाद्रींना देशभाषेच्या शिक्षणाची किती आवश्यकता भासत होती, याची कल्पना सहज करतां येईल. हा प्रकार केवळ गोव्यांतच होता असें नव्हे. उत्तरेकडे व दक्षिणेकडे तो सर्वत्र होता. मानोएल द आसुंसांव नांवाच्या एका आगस्टिनियन पाद्रीनें डाका येथील बंगाली बोलीचें एक व्याकरण ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या उपयोगाकरितां म्हणून लिहून १७४३ सालीं मुद्रित केलें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत तो फादर जॉन बार्सिस्टा याचे विचार उद्धृत करितो ते असे :-"आपल्या कळपाची ज्याला भाषा माहीत नाहीं तो मुळीं मिशनरीच नव्हे; आणि (देशी भाषेचें अज्ञान) हें त्याचें एक महापातक आहे. आधीं या भाषेचा अभ्यास केल्याखेरीज त्याच्या या पापाचें क्षालन कोणत्याही प्रकारें होतांच कामा नये."

पाद्री आंतोनियु सालदाञ्ञ यानें स्वाभाविकच देशी भाषेचा चांगलाच अभ्यास केला असला पाहिजे; परंतु देशभाषा म्हणजे लोकांच्या नित्याच्या व्यवहारांतील बोली आणि सुशिक्षित लोक लेखनवाचनाकरितां योजीत असलेली ग्रांथिक भाषा. या धर्मोपदेशकांचें शिक्षित व अशिक्षित अशा दोघांशीं व्यवहार करण्याकरितां उपयोगी पडणारी अशी बोली शिकण्याकडे प्रथम लक्ष असे. लोकांच्या नित्याच्या व्यवहारांतील ही भाषा असल्यामुळें ती शिकणेंही सोपें जाई त्या काळीं विदेशी लोकांच्या उपयोगाकरितां जे कोश व व्याकरणें निर्माण झालीं तीं या बोलीचींच आहेत. प्रत्येक जातीच्या बोलीमध्यें फरक असल्यामुळें हे लोक विशेषतः ब्राह्मणांच्याच बोलीचा प्रथम अभ्यास करीत. १५८५ सालच्या तिसऱ्या धार्मिक परिषदेंत ख्रिस्ती धर्माची माहिती देणारा प्रथम पोर्तुगीज भाषेंत एक ग्रंथ तयार करून तो जेथें जेथें म्हणून लोकांचें ख्रिस्तीकरण चालू असेल त्या त्या ठिकाणच्या भाषेंत भाषांतरीत करावा, असा ठराव करण्यांत आला होता. या ठरावान्वयें गोमंतकाकरितां म्हणून जो ग्रंथ तयार झाला तो म्हणजे फादर तोमास स्टिफन्स याची 'दौत्रिन क्रिस्तां' हा होय. १६२२ सालीं तो प्रथम मुद्रित झाला. त्यावर "em lingoa Bramana Canarim" म्हणजे 'कानारी ब्राह्मणी भाषेंत' लिहिल्याचें नमूद आहे. कानारीं म्हणजे काठावरचे (Coasters). किनारा हा मूळ फारसी शब्द असून अलिकडही तो मराठींत प्रचलीत आहे. अरब लोकांनीं कोकणच्या समुद्रकांठावरील लोकांना ही संज्ञा प्रथम दिली व त्यांच्यामागून आलेले पोर्तुगीज लोक तिचा अपभ्रष्ट स्वरूपांत वापर करूं लागले, हें उघड दिसतें.

फादर स्टिफन्सनें ब्राह्मणांच्या बोलींत 'दौत्रिन क्रिस्तां' हा क्रिस्तीधर्मतत्वाची माहिती देणारा प्रश्नोत्तररूप ग्रंथ लिहिला खरा; परंतु त्यानें लोकांचें समाधान होईना म्हणून त्याला ग्रांथिक भाषेंत क्रिश्चनपुराण लिहावें लागलें, असें त्यानें १६१६ मध्यें मुद्रित झालेल्या आपल्या पुराणांत स्पष्ट नमूद केलें आहे :

एके रविवारीं संध्याकाळीं या दौत्रिनीचें पठण संपल्यावर एक ब्राह्मण पाद्री-गुरूजवळ म्हणजेच स्टिफन्सजवळ येऊन म्हणाला,

हें दौत्रिनी वांचोनि आन । कांहीयेक आगळें शास्त्रपुराण ।
जरी आम्हां करवित पठण । तरी होतें चांग ॥
जैसें त्यां त्यां दिपावतीं । देसपरिचीं पुराणें हाती ।
तैसीं पुस्तकें कां नमेळती । आमंचां देसीं ॥
हा मोठा अभिप्रावा जो म्हणे । तुमीं तरीं वारिलीं मागिलीं पुराणें ।
तरी प्रतिपुस्तकें आमांकारणें । कैसीं न करिती तुमीं ॥
या पासोनिया जी आतां । जेंतियांच्या पुराणकथा ।
नव्या क्रिस्तावांच्या चिता । आठवती देखा ॥
जरी मराठीय भाषचीं कांहीं । शास्त्रपुराणें होतीं आमां ठायीं ।
तरी लाकाचा मनोरथु पाई । पूर्ण होता ॥

त्याला पाद्रीगुरूनें म्हणजे स्टिफन्सनें काय उत्तर दिलें पहाः—

तंव त्या क्रिस्तांवाच्या बोला । पाद्रीगुरू उलासला ।
म्हण तूं भला रे भला । प्रुस्दनु केलासि चांगु ॥
संतोसलां तुझिय मति । जें विचारिलें मजप्रती ।
तें आइक पां यकचित्तीं । सांगैन जें ॥
फ्रिंगियांचें बोलणें अवधारीं । ते उपमा देती कवणेपरी ।
म्हणती एके दिवसीं रोमनगरी । उभविली नाहीं ॥
जें आमीं केलें नाहीं अजोनिवरी । तें देवो सिधी नेईल फुडारीं ।
भक्तश्रुतियां जिविची उरी । पुरविल स्वामी ॥

अशा प्रकारें नवक्रिश्चनांच्या आग्रहावरून जुन्या हिंदु मराठी ग्रंथाच्या धर्तीवर स्टिफन्सनें हें क्रिस्ती मराठी पुराण लिहिलें. हिंदूंचा जसा प्रमाण ग्रंथ गीता, तसा क्रिस्ती लोकांचा प्रमाण ग्रंथ बायबल आहे. ज्ञानेश्वरानें **'अमृतातेंही पैजा जिंके'** अशा प्रकारच्या भाषेंत गीतेवर टीका लिहिली. त्याप्रमाणेंच स्टिफन्सनें **'पुस्पांमाजी पुस्प मोगरी। कीं परिमळांमाजी कस्तुरी। तैशी भासांमध्यें साजिरी'** असलेल्या **मराठियं**मध्यें बायबलवर ओवीबद्ध ग्रंथ रचण्यास सुरुवात केली, व ही त्याची लेखन-कामाठी १६१४ सालीं शेवटास गेली. या ग्रंथानें केवळ क्रिस्ती लोकांसच चटका लावला असें नव्हे, तर हिंदुलोकदेखील या ग्रंथाची वाखाणणी करूं लागले, ("This work is so agreeable that not only do the Christians derive much profit from it, but even the gentoos pride on speaking of it,") असें १ फेब्रु. १६२० मधल्या एका पत्रांत नमूद आहे. स्वतः स्टिफन्सनेंही आपल्या

अर्पणपत्रिकेंत, “ हा ग्रंथ एतद्देशीय पद्धतीला अनुसरून रचिला असून ही लेखनशैली येथील रहिवाशांना विशेष आवडती आहे, ( “ he uma obra composta a modo da terra, e no estilo de que os naturaes mais gostam”,) असें लिहिलें आहे.

केवळ वरिष्ठ जातींच्या लोकांना संतुष्ट करण्याकरितांच युरोपियन मिशनऱ्यांना ग्रांथिक मराठी शिकावी लागली असें नव्हे; तर हिंदुधर्माचें खंडन करण्याकरितां हिंदूंचे जुने मराठी ग्रंथ अभ्यासिण्याची त्यांना आवश्यकता भासली. नव्या क्रिस्ती धर्माची माहिती देण्याबरोबर जुन्या धर्माच्या चुका दाखविणें व तो कसा त्याज्य आहे, हेंही लोकांच्या गळीं उतरविणें धर्मांतरकार्याच्या दृष्टीनें त्यांना अवश्य होतें. पहिलें कार्य स्टिफन्सच्या क्रिस्तपुराणानें केलें, तर दुसरें कार्य करण्याकरितां एतियेन द ला क्रुवा नांवाच्या एका फ्रेञ्च पाद्रीनें १६२९–३५ सालीं सेंट पीटरवरील पुराणग्रंथ रचून मुद्रित केला. या पाद्रीला गोव्याची कानारी (कोकणी) बोली व ग्रांथिक मराठी अशा दोनही भाषा चांगल्या अवगत होत्या, व त्या भाषांत लिहून प्रसिद्ध केलेल्या त्याच्या ग्रंथांची फार वाखाणणी होत आहे, असें Fr. Alex de Rhodes यानें १६२१ सालच्या फ्रेञ्च भाषेंत लिहिलेल्या आपल्या प्रवासवर्णनांत लिहिलें आहे. ( “ Il avait si parfaitement appris les deux langues du pays, la **canarine**, qui est vulgaire et la **maraste** qui est comme chez nous la latine qu'il les parlait mieux que ceux memes du pays, et avait, imprime plusieurs livres en l'une et en l'autre qui sont estime's de tous. . . ” ). असें जरी असलें तरी आपल्या या ग्रंथाकरितां त्यानें बोली भाषेचें माध्यम स्वीकारलें नाहीं. कारण वादविवाद सुशिक्षितांशीं करावयाचा असतो. अशा लोकांची भाषा ग्रांथिकच असावयाची. म्हणून त्यानें ग्रांथिक मराठींत पंधरावीस हजार ओव्यांचें हें खंडणात्मक पुराण रचिलें. अशा प्रकारच्या वादविवादांना उपयोगी पडावीं म्हणून सोळाव्या–सतराव्या शतकांत रोमन लिपींत लिहिलेलीं मिशनऱ्यांच्या हातचीं मराठी ग्रंथांतील उताऱ्यांतील टांचणें पोर्तुगालांत उपलब्ध आहेत. त्यांच्या हजार दोन हजार पानांच्या मायक्रोफिल्म नकला मुंबई विद्यापीठाच्या मदतीनें पोर्तुगालमधून मीं आणविलेल्या आहेत. त्यांत कांहीं स्टिफन्स, क्रुवा किंवा सालदाञ्ज यांच्या हातचीं देखील टांचणें असणें अशक्य नाहीं.

कोणत्याही धर्मामध्यें संतांनाही फार महत्त्व असतें. देव स्वर्गांत असतो, परंतु संत हे त्याचे भूतलावरील प्रतिनिधि असतात. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, व त्याकाळीं नुकताच सदेह वैकुंठाला गेल्याबद्दल ज्याचा गवगवा झाला असावा तो तुकाराम, हे संत त्याकाळीं गोव्यांतील लोकांच्या दृष्टीपुढें असावेत. चमत्कारांशिवाय नमस्कार नाहीं, अशी म्हण आहे. सर्वसाधारण जनमनावर

चमत्कारांचा फारच मोठा पगडा असतो. चमत्कार करणाऱ्या किंवा करतो असा ज्याचा लौकिक आहे अशा साधूच्या भजनीं इतर धर्माचेहि लोक लागतात, असें आपण आजही पाहातों.

क्रिस्ती धर्मामध्यें चमत्कार करणाऱ्या संतमहंतांची वाण नाहीं, ही गोष्ट नव-क्रिश्चनांच्या व इतर एतद्देशियांच्या मनावर बिंबविण्याकरितां आंतोनियु द साल्दान्ह या उपरिनिर्दिष्ट पाद्रीनें पादुअ येथील संत ॲंटनी (किंवा सांतु आंतोनी) याचें चरित्रवर्णन करण्याचें योजिलेलें दिसतें. पुढें दिलेलें "सांतु आंतोनिची जीवित्वकथा" हें ओवीबद्ध मराठी पुराण हा त्याचा या विषयावरचा मुख्य ग्रंथ नाहीं. मुख्य ग्रंथ त्यानें गद्यांत व बोली भाषेंत लिहिलेला आहे. या ग्रंथांत क्रिस्ती धर्माविरुद्ध कांहीं नसल्याबद्दल जो जेजुईट पाद्री जुवांव द पेद्रोज (याचाही 'देवाचीं एकाग्र बोल्णीं' किंवा Soliloquios divinos नांवाचा ब्राह्मणी बोलींतील १६६० सालीं मुद्रित झालेला ग्रंथ उपलब्ध आहे.) याचा, ३ अक्टोबर १६५१ तारीखेचा दाखला जोडला आहे, त्यांत हे चमत्कार ब्राह्मणांच्या चालू भाषेंत ("em lingua bramana vulgar") भाषांतरीत केलें असल्याचें नमूद आहे. "सर्वांनाच जास्त सोपेपणानें कळावे म्हणून स्थानिक चालू भाषेंत हे चमत्कार लिहिले आहेत. ("Compostas na lingua da terra corrente para serem de todos mais facilmente entendidos") असें या ग्रंथाच्या मुखपृष्ठावरही लिहिलेलें आढळतें. या ग्रंथाचे दोन भाग पाडले आहेत. पहिल्या भागांत संत आंतोनी जीवंत असतांना झालेल्या तीस चमत्कारांची व दुसऱ्या भागांत त्याचें निर्याण झाल्यानंतरच्या तेवीस चमत्कारांची माहिती देण्यांत आली आहे. पुढें दिलेल्या ग्रांथिक मराठींतील 'सांतु आंतोनिच्या जीवित्वकथेंत' त्याच्या हयातींतील केवळ अठराच चमत्कार वर्णिले आहेत व निधनोत्तर चमत्कारांचा ओझरता निर्देश तेवढा केलेला आहे, असें दिसून येईल. आपल्या ब्राह्मणी, किंवा मराठी बोली प्रस्तावनेंत हा कवि आपल्या ग्रंथरचनेचें उद्दिष्ट सांगतांना लिहितो,

—"परमेश्वराला विनंतिप्रार्थना करितात; पण दयालु भक्त संत आंतोनी मनुष्यांनीं स्मरण करतांच जसा गरजेला आणि आकांताला लवकर धांव घेतो तसा अन्य कोणीही पावत नाहीं. संकटकाळीं तो कोणाचीही उपेक्षा करीत नाहीं. त्याचें स्मरण करतांक्षणीं तो पावतो. आम्ही या नश्वर जगांत असेपर्यंत गरजांतच आहोंत. गरज नाहीं असा कोणीही नाहीं. आत्म्याला असो किंवा शरीराला असो, गरज ही आहेच. आमची गरज टाळणारा, आमच्या हाकेला पावणारा, आमच्या कार्याला उभा ठाकणारा, साहाय्यकर्ता सारथी हवाच. संत आंतोनीसारखा दयालु साह्यकारी सगळ्या विश्वांत शोधल्यास अन्य मिळणार नाहीं. हें सत्य म्हणून सर्वही लोकांना दाखविण्याकरितां मीं हा त्याच्या आश्चर्यकारक चमत्कारांचा ग्रंथ लिहिला आहे. तो वाचल्यावर,

आंधळ्यांना डोळे, मेलेल्यांना जीवदान, मुक्यांना वाचा, रोग्यांना आरोग्य, बहिऱ्यांना ऐकणें, थोट्यापांगळ्यांना हातपाय, संकटांत सांपडलेल्यांना आधार कसा मिळाला तें सविस्तर दृष्टीस पडेल. ”

संतचरित्रें लिहिण्याचा प्रघात आपल्यामध्यें फार जुन्या काळापासून चालू आहे. ज्ञानेश्वराचें चरित्र त्याच्याच काळीं सच्चिदानंदबाबानें लिहिलें, असें भावे लिहितात. श्री ज्ञानदेवाची आदि हें ज्ञानदेवचरित्र नामदेवविरचित म्हणून उपलब्ध आहे. महानुभावांचे लीळाचरित्र वगैरे ग्रंथ तर प्रसिद्धच आहेत; परंतु संतचरित्रकार म्हणून उद्धवचिद्घन (शके १६११ च्या आसपास) आणि महीपति (जन्म श. १६३७–निधन श. १७१२) हे महाराष्ट्रांत विशेष प्रसिद्ध आहेत; परंतु यांच्याही पूर्वी हा क्रिस्ती मराठी चरित्रकार होऊन गेला होता, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होय.

‘ सांतु आंतोनिची जीवित्वकथा ’ या ग्रंथांत कथन केलेले चमत्कार वाचतांना आपल्याकडील महाराष्ट्रीय संतांच्या चमत्कारांची आठवण ठिकठिकाणीं झाल्यावाचून राहात नाहीं. पाश्चात्य व पौर्वात्य संतांच्या चमत्कारांमधील हें विलक्षण साम्य पाहून भाविक लोकांच्या मनाची बैठक जगांत सर्वत्र सारखीच असते, असें दिसून येतें.

प्रस्तुत पुराणांतील पहिलाच वेसराचा चमत्कार किंवा दुसरा मत्स्यांचा चमत्कार वाचून, ज्ञानेश्वरानें रेड्याच्या मुखानें वेद वदविणें (अ.९), तुळसीदासानें दगडाच्या नंदीला नैवेद्य भक्षण करावयास लावणें (अ. २), पिपाजी राजाच्या उपदेशावरून वाघानें क्रूरता सांडणें (अ. २६), किंवा रसिक मुरारचा उपदेश ऐकून हत्तीनें संतवृत्ति स्वीकारणें (अ. ३७), अशा सारख्या भक्तविजयांतील चमत्कारांची आठवण होईल.

परमेश्वराच्या कृपेनें विषबाधा न होणें (चमत्कार ३) असे चमत्कार आपल्याकडेही पुष्कळ आहेत.

एका भाषेत केलेलें शास्त्रकथन निरनिराळ्या भाषिकांना आपआपल्या भाषेत ऐकूं जाणें हा चौथा चमत्कार वाचून,

**ज्या ज्या देशीं जाती तीर्था । तेथें तैसीच करिती कविता ।**
**भाषापरत्वें अमोलिकता । गुण वर्णिती हरीचे ॥**

हा ज्ञानेश्वर व नामदेव यासंबंधीं भक्तविजयांतील (अ. ११) चमत्कार मनापुढें येईल.

पांचव्या चमत्कारांतील स्त्री ही तर संतविजयांतील (अ. ३५) संत सखूच आहे.

कीर्तनसमयीं आलेलें प्रचंड वादळ श्रोतृवृंदांना बाधलें नाहीं, हा सहावा चमत्कार वाचून नामदेवाचें खोपट वादळापासून बचावलें ही भक्तविजयांतील (अ. २१)

कथा, किंवा तुकारामाच्या कीर्तनांत यवनांनीं वेढा दिला असतां तें अरिष्ट दूर झालें ही गोष्ट ( अ. ४८ ) आठवूं लागेल. देवाचें संताला दर्शन ( च. ७, १४ ) हे चमत्कार नामदेव, तुकाराम, रामदास वगैरे संतांच्या कथांत आपणाकडेही अनेक दिसून येतात. एका स्वार्थी माणसाच्या काळजाचा 'गोंडा' त्यांच्या मरणानंतर त्याच्या घरांतील द्रव्याच्या पेटींत सांपडला, हा आठवा चमत्कार मात्र आपणांस अभिनव वाटेल. पश्चात्तापानें पापनाशन होतें ही नवव्या चमत्कारांतील कल्पना आपणास नवीन नाहीं. दहाव्या चमत्कारांतील मातृद्वेष्ट्या पुत्राची कथा वाचून पुंडलिकाचें स्मरण झाल्याखेरीज राहात नाहीं. अकरा, बारा व तेरा या चमत्कारांतील सैतानाचीं कृत्यें वाचून नळासारख्या पुण्यश्लोकांना त्रास देणारा कलि आपल्या मनासमोर उभा राहील. हिशेबाच्या अडचणींत सज्जन सांपडला असतां ( चमत्कार १७ ) त्याच्या संकटाला धावणें यासंबंधींचे चमत्कार, दामाजी ( अ. ४०. ), नरसिंह मेहता ( अ. २९. ), सुरदास ( अ. ३६. ), विसोबा सराफ ( ५७. ), यांच्या कथांत भक्तविजयामध्यें आढळतील. संत आंतोनीच्या बापावर खूनाचा आरोप होऊन तो फांसीं जाण्याचा प्रसंग आला असतां, ज्याचा खून झाला त्या मृत माणसानें खड्ड्यांतून वर येऊन या माणसानें आपला घात केला नाहीं असें सांगून त्याचा जीव वांचविला, ही अठराव्या अध्यायांतील कथा मजेदार आहे. हा चमत्कार वाचून भानुदासावर चोरीचा आळ आला असतां, सुळावर चढविण्याच्या वेळीं, सुळाचा फलपुष्पांनीं युक्त असा वृक्ष बनला ह्या भक्तविजयांतील कथेची ( अ. ४३. ) आठवण होईल.

गोमंतकांतील ब्राह्मणी बोलींत जे याखेरीज जास्त चमत्कार निर्दिष्ट केले आहेत, त्यांच्यामध्यें आणि आपल्या इकडील भक्तांच्या कथांमध्यें देखील पुष्कळच साम्य आहे. असो.

एकाद्या प्रसंगाचें थोडक्यांत हुबेहुब शब्दचित्र रेखाटण्याचें या कवीचें कसब, मत्स्यकुळाचें शास्त्रश्रवण ( च. २ ), शास्त्रकथनाच्या वेळचें वादळ ( च. ६ ), सैतानाचें कपट ( च. १३ ), क्रिस्तदर्शन ( च. १४ ), वडिलांची फांसापासून सोडवणूक ( च. १८ ) वगैरे कथांवरून चांगल्याप्रकारें निदर्शनास येतें.

या कवीचीं भाषिक वैशिष्ट्यें तळटीपांमध्यें ठिकठिकाणीं नमूद केलीं असल्यामुळें या ठिकाणीं पुनः त्यांची पुनरुक्ति करण्याचें कारण दिसत नाहीं. एक गोष्ट मात्र या ठिकाणीं नमूद करणें अवश्य वाटतें ती ही कीं, हा कवि जरी सतराव्या शतकांतील असला तरी त्याच्या ग्रंथाची भाषा मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, वामन वगैरे सारख्या समकालीन कवींसारखी नाहीं; ती त्यांच्याहीपेक्षां बरीच जुनी आहे. असें होण्याचें कारण हें कीं, ज्या प्रदेशांत त्याचें वास्तव्य होतें, त्या गोमंतकांतील सासष्टींतील प्रचलित बोलीचें स्वरूप ग्रांथिक मराठीपेक्षां निराळें होतें. त्याच्यापुढें जे हिंदूंचे मराठी जुने हस्तलिखित

ग्रंथ होते त्यांचा, किंवा स्टिफन्स किंवा क्रुवा या आपल्या पूर्वीच्या क्रिस्ती कवींच्या मराठी काव्यांचा अभ्यास करून त्यानें आपला ग्रंथ रचिला असला पाहिजे. गोवा बेटांत १५४१ सालीं हिंदूंच्या धर्मच्छळाला सुरवात झाली, याचा वर उल्लेख आलाच आहे. हिंदूंचे देव व देवळें फोडलीं आणि त्यांचे ग्रंथ हिरावून घेण्यांत आले. यापैकीं कांहीं जाळले तरी कांहीं हिंदुधर्मखंडनार्थ स्वतःच्या अभ्यासाकरितां त्यांनीं राखून ठेविले असावेत. अशा प्रकारच्या कांहीं ग्रंथांचीं पोर्तुगीजींत भाषांतरें झालेलीं रोममध्यें उपलब्ध असून तीं लवकरच प्रसिद्ध करण्यांत येणार आहेत, असें फादर विकी ( रोम ) यांकडून आम्हांकडे करण्यांत आलेल्या पृच्छांवरून कळतें. गोव्याचा पहिला बिशप दों जुवांव द आल्बुकेर्क यानें, ता. २८ नवंबर १५४८ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत, हिंदुधर्माचे ग्रंथ आपण किती कसोशीनें गोळा करीत आहों, आणि दादाजी नांवाच्या एका वजनदार हिंदु गृहस्थानें व स्वतः गव्हर्नरनेंदेखील एका गृहस्थाचे ग्रंथ ज्याचें त्याला परत करण्याची गळ घातली असतां ते आपण कसे दिले नाहींत, याचा तपशीलवार वृत्तांत लिहून ठेवलेला उपलब्ध आहे. १५५६-५७ च्या सुमारास सासष्टीमध्यें हिंदु देवदेवळें फोडण्याचा सपाटा सुरू झाला. त्याच्या आधींचे ग्रंथ स्टिफन्स, क्रुवा, किंवा आंतोनियु द सालदान्य या प्रस्तुत कवीच्या पुढें असावेत. १५६० सालीं स्थापन झालेल्या इंक्विझिशनच्या कायद्याप्रमाणें, आक्षिप्त ग्रंथ वाचणारे किंवा ते जवळ ठेवणारे ( que tem e lem os livros defesos. ) लोक शिक्षेला पात्र होत. या इंक्विझिशनची कमाल शिक्षा म्हणून Auto de fe' नांवाच्या उत्सवांत गुन्हेगाराला जाळूनही टाकण्यांत येत असे, याचा निर्देश वर आलाच आहे. तसीच त्याची मालमत्ता जप्त होई व तिच्यापैकीं अर्धी खऱ्याखोट्या गुन्ह्याची वर्दी देणाऱ्याला मिळे व बाकीची अर्धी इंक्विझिशनच्या खातीं जमा होई. Françoes Pyrard नांवाच्या एका फ्रेंच प्रवाशानें, प्रॉटेस्टंट पंथाचे ग्रंथ जवळ बाळगल्याबद्दल खुद्द आपल्या नवऱ्याविरुद्ध इंक्विझिशनकडे कागाळी नेऊन एका बाईनें त्याची अर्धी संपत्ति अशाप्रकारें कशी मिळविली, याची माहिती आपल्या प्रवासवर्णनांत कथन केली आहे. पोर्तुगालचे राजदरबारदार आंतोनियु बायांव यांनीं देखील आपल्या गोवा-इंक्विझिशनवरील ग्रंथांत या गोष्टीचा निर्देश केलेला आहे.

अशा परिस्थितींत जुनेच ग्रंथ जवळ बाळगिणें जेथें धोक्याचें होतें, तेथें मराठी हिंदु ग्रंथांची बाहेरून पोर्तुगीज मुलुखांत नवी आयात होणें किती कठीण होतें, तें स्पष्ट दिसून येईल.

दुसरी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, सद्या मुद्रणाची कला, दळणवळणाचीं साधनें आणि टपालाची सोय यांच्यामुळें एखादा ग्रंथ लिहून झाल्याबरोबर तो लगेच छापला जाऊन जगभर वाचकांच्या हातीं पडूं शकतो. तसा प्रकार पूर्वी नव्हता. त्याकाळीं एखादा ग्रंथ लोकप्रिय होऊन त्याच्या हस्तलिखित नकला दूरवर पसरण्यास

फार काल लागे. त्यामुळें स्टिफन्स, क्रुवा, साल्दाञ्ञा वगैरे मिशनरींच्या पुढें असलेले ग्रंथ तीसपन्नास किंवा शंभरदोनशेंही वर्षांमागचे असावेत त्यामुळें या क्रिस्ती मराठी वाङ्मयांत आपणास महानुभावांच्या वाङ्मयांत किंवा राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या एकनाथपूर्व ज्ञानेश्वरींत आढळणारे भाषिक विशेष दृष्टोत्पत्तीस येतात.

राजवाडे यांनीं 'विश्ववृत्त' मासिकामध्यें (वर्ष २ अं. ८) स्टिफन्सच्या क्रिस्तपुराणावर लिहितांना त्याच्या भाषेवर झोड उडविली आहे. "हें पुराण इ. स. १६१५ (?) सालीं प्रथम तयार झालें. म्हणजे एकनाथ, दासोपंत वगैरेंचा समकालीन स्टेफेन्स होता व त्याची भाषा दासोपंताच्या भाषेसारखी किंवा शिवकल्याणाच्या भाषेसारखी असली पाहिजे," अशी जी राजवाड्यांची समजूत ती चुकीची कशी आहे, हें वरील विवेचन लक्षांत ठेविलें असतां कळून येईल. राजवाड्यांचा हा लेख १९०८ सालच्या फेब्रुवारीमध्यें प्रसिद्ध झाला. त्याच्यानंतर राजवाड्यांनीं ज्ञानेश्वरी (१९०९) आणि चोंभा कवीचें उषाहरण (१९११) हीं काव्यें प्रसिद्ध केलीं. ज्ञानेश्वरांचा योगवासिष्ठही मागाहूनच (१९१४) प्रसिद्ध झाला. ह्या ग्रंथांची भाषा राजवाड्यांच्या आधीं लक्षांत आली असती तर स्टिफन्सची भाषा त्यांना कदाचित् गांवढळ वाटली नसती.

हें क्रिस्ती मराठी वाङ्मय रोमन लिपींत असल्यामुळें आणि या लिप्यंतर-पद्धतीच्या अपूर्णत्वामुळेंही कांहीं दुर्बोधता या वाङ्मयाला प्राप्त झाली आहे, हें नाकारतां येत नाहीं. पण त्याचबरोबर ही रोमन लिप्यंतराची पद्धति राजवाड्यांना नीट कळली नसल्यामुळें त्यांना ही भाषा जास्तच अशुद्ध वाटली हेंही पण खरें आहे. यासंबंधीं जास्त उहापोह फादर मिरांडा हे मागें क्रमशः प्रसिद्ध करीत असलेल्या देवनागरी लिपींतील क्रिस्तपुराणाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत (पाक्षिक शांतिदूत, मुंबई, अं. ६-१०, १९४९) मीं केलेलाच आहे. आपल्यापुढें असलेलें बहुतेक प्राचीन मराठी मुद्रित वाङ्मय त्यावर संपादकीय संस्कार झाल्यामुळें आपणास शुद्ध वाटतें; परंतु हेच ग्रंथ मूळ हस्तलिखित स्वरूपांत जे कोणी पाहातील, त्यांना क्रिस्ती मराठी वाङ्मयांत अशुद्ध वाटणारी भाषा या हिंदूंच्या ग्रंथांतही भरपूर प्रमाणांत आढळेल.

सतराव्या किंवा त्यापूर्वीच्या शतकांतील कोणताही मराठी ग्रंथ निःसंशयपणें कवीच्या हातचा म्हणतां येईल, असा आज उपलब्ध नाहीं. आपल्यापुढें असलेल्या ह्या सर्व ग्रंथांची भाषा पुढील लेखकांनीं प्रतिलेख करतांना जाणत किंवा नेणत केलेल्या बदलांमुळें, मूळ स्वरूपांत राहिलेली नाहीं; परंतु सतराव्या शतकांतील क्रिस्ती मराठी ग्रंथ स्वतः कवीच्या नजरेखालीं मुद्रित झालेले असल्यामुळें स्वतः कवीनें स्वहस्तें लिहिलेल्या ग्रंथांप्रमाणेंच त्यांना महत्त्व आहे. हा या वाङ्मयाचा एक विशेष म्हणतां येईल.

स्टिफन्सचें क्रिस्तपुराण प्रथम १६१६ सालीं प्रसिद्ध होऊन त्याच्या पुढें त्याच

शतकांत आणखी १६४९ व १६५४ अशा दोन आवृत्त्या निघाल्या. या तीनही आवृत्त्यांपैकीं एकही मुद्रित प्रत जगांत कोठेंही आज उपलब्ध नाहीं. परंतु गोव्यांतील सेंट कायतान कॉन्व्हेंटमध्यें असलल्या प्रतीवर ती तिसऱ्या आवृत्तीवरून जशाची तशी प्रतिलिखित केल्याचें नमूद आहे. क्रुवाचें १६२९ सालचें सेंट पीटरवरील पुराण किंवा सालदाञ्याचें प्रस्तुत १६५९ सालची सांतु आंतोनिची जीवित्वकथा हे दोनही ग्रंथ तर मुद्रित स्वरूपांतच उपलब्ध आहेत.

प्रस्तुत पुराणाखेरीज आणखीही एक हस्तलिखित मराठी ग्रंथ बोली व ग्रांथिक अशा द्विविध स्वरूपांत याच सालदाञ्ञ कवीनें लिहिलेला उपलब्ध आहे. तो कधींही मुद्रित झालेला दिसत नाहीं. याच्या आठशेंवर ओंव्या आहेत. त्याचें नांव Fruitos de Arvore da Vida, म्हणजे 'जीवितवृक्षाचीं फळें' याची युरोपांतून मायक्रोफिल्म काढून आम्हीं आणविली आहे. पण तिचें अक्षर अस्पष्ट असल्यामुळें अक्षरबोध होणें कठीण पडतें. तरीपण याही ग्रंथाचें देवनागरींत लिप्यंतर करण्याचा आमचा प्रयत्न चालू आहे. या ग्रंथाच्या भाषेची कल्पना येण्याकरितां नमुन्यादाखल आरंभींच्या नमनपर कांहीं ओंव्या खालीं उद्धृत करतों :

**नमन माझें देवकुमरा । क्रिस्ता स्वामिया करुणाकरा ।**
**प्रणिपातु करितों दातारा । तुजां चरणीं १**

**नमन माझें देवनंदना । विश्वकर्त्या जगजीवना ।**
**ग्न्यानशेंधु परिपूर्णा । जेजु क्रिस्ता स्वामिया २**

**जय नमो साल्वाडोरा । विस्वतेजा देवकुमरा ।**
**विस्वव्यापका अपरंपारा । क्रिस्तराया ३**

**जो सर्व गुणीं संपूर्णु । ग्न्यानशेंधु जगजीवनु ।**
**मुग्तिराजु पुण्यपावनु । कृपाशेंधु ४**

**आतां नमो देवनंदनु । क्रिस्त स्वामी जगजीवनु ।**
**सर्वगुणीं सर्वसंपूर्णु । कृपाशेंधु ५**

**नमो स्वामी मारियेनंदना । विश्वभरिता देवा परिपूर्णा ।**
**दयाशेंधु जगत्कल्याणा (?) । जेजु क्रिस्ता स्वामिया ६**

**नमो स्वामिया जेजु क्रिस्ता । गुणसंपूर्णा पूर्णभरिता ।**
**ग्न्यानशेंधु विश्वकर्ता । सर्व सिधीचा दातारा ७**

**नमन माझें देव-आत्मजा । तूं परम गतीचा मुग्तिराजा ।**
**आतां स्वामीं करीं पतिकरु माजा । कृपावरु देउनु ८**

या ग्रंथांत काय वर्णिलें आहे तें यां मराठी ओव्यांच्या आरंभीं कवीनें पुढील शब्दांत नमूद केलें आहे :

**जेजु नांवाची तुस्ती** (स्तुती). **पवाडे, वा कवणे परी क्रिस्तु स्वामी मनुष्य दोसा पासाउनि क्रुसीं म्रुत्यु पातला त्याची कथावित्पति.**

'सांतु आंतोनीची जीवित्वकथा' या ग्रांथिक मराठी भाषतील पुराणाप्रमाणेंच या लेखकानें गोमंतकांतील ब्राह्मणी बोलींत कथन केलेले संत आंतोनीचे चमत्कार स्वतंत्र पुस्तकरूपानें सटीप प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे. त्यामुळें तीनशें वर्षांमागचें एका मराठी बोलीचें स्वरूप कसें होतें, तें आपणास कळून येईल. भाषाशास्त्रदृष्ट्या या बोली वाङ्मयाला ग्रांथिक वाङ्मयापेक्षांही मी जास्त महत्त्व देतों. कारण मागें आपण कसे लिहीत होतों हें कळण्यास जुनें ग्रांथिक मराठींतील वाङ्मय हवें तितकें मिळूं शकतें; परंतु जुन्याकाळीं आम्हीं कसे बोलत होतों, तें कळण्यास मार्ग नसतो. साक्षरतेच्या प्रसाराबरोबर आपल्या बोलींचें स्वरूप झपाट्यानें बदलत आहे व कांहीं बोली तर अजिबात नष्ट होण्याच्या मार्गाला लागल्या आहेत. असो.

कोणत्याही हेतूनें कां होईना, मराठी भाषेचा अभ्यास व सेवा ज्यांनीं केली ते सर्व मराठेच आहेत, असें आपण यापुढें मानलें पाहिजे. अशी दृष्टि ठेवून क्रिस्तीतर लोकदेखील प्रस्तुत ग्रंथाकडे सहानुभूतीनें व कौतुकानें पाहातील, आणि भाषाशास्त्रदृष्ट्या हा ग्रंथ सर्वांना उपयुक्त वाटेल अशी मी आशा करतों.

पाद्री आंतोनियु सालदाञ्ज हा मराठी कवि १६६३ सालीं गोव्यांतच मरण पावला.

वर सातव्या पृष्ठावर सोळाव्या किंवा सतराव्या शतकांतील मिशनऱ्यांच्या रोमनलिपींतील मराठी टांचणांचा उल्लेख केला आहे, त्यांच्यापैकीं एका पृष्ठाच्या कांहीं भागाचें छायाचित्र पुढील पृष्ठावर दिलें असून त्याच्याच खालीं त्याचा प्रतिलेखही छापला आहे. तसेंच या उताऱ्याचें देवनागरी लिप्यन्तरही पुढें त्याच्या नंतरच्या सोळाव्या पृष्ठावर दिलें आहे. **कृष्णदास नामा** या कवीच्या भागवतान्तर्गत दशम स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायांतील या पहिल्या पांच ओव्या आहेत. हा ग्रंथ अप्रकाशित आहे. इतकेंच नव्हे, तर अशाप्रकारचा ग्रंथ मराठींत लिहिला गेला होता हें पहिल्यानेंच पुढें येत आहे, असें मला वाटतें. चांदोरकरांच्या महाराष्ट्रीय 'संत-कविकाव्यसूची' मध्यें या ग्रंथाचा निर्देश नाहीं. हीं हजार दोन हजार पृष्ठें असलेलीं टांचणें वाचलीं तर अशाच पुष्कळ अप्रसिद्ध मराठी ग्रंथांवर प्रकाश पडण्याचा संभव आहे.



स्री केशवाये नम । जेणें गोकुळ पाळिलें । गोवर्धनाथें धरिलें । गोपिकार्थें रमविले । गुणें करूनि ॥ १ ॥ विश्वार्थें रचिता । विश्व आपणचि पाळिता । विश्व संहारुनि मागुता । उरे विश्वरुपु ॥ २ ॥ देवकिये उधरीं वाहिला । दसमतियें पाळिला । दुर्योधनाचा वैरी जाहाला । द्रुपदिये कारणे ॥ ३ ॥ ऐसा तीं अखेरीं । विस्तारला चराचरीं । त्या गुरुच्या चरणा वरि । नमस्कारु माझा ॥ ४ ॥ गुरुन देवो दाविला । म्हणउनि गुरुचि देवो मानिला । जैसा देवो तैसा भाविला । येक स्वरूपे ॥ ५ ॥ गुरुमैत्र

कृष्णदास नाम्याचें भागवत

( दशम स्कंध – अध्याय दुसरा, ओवी १ ते ५ )



100

PADVA

MHALLALEA

XARANTVLEA SANcto Antonichy eiuitua catha.

13 de Iunho.

NAmone maze Paramesparà
Suerga frustichea rochennara
Crupaxendio caroymaccra
Mugeiraya. 1.
Nemo Mariye fuzminny
Tu suerga sauntsarachy ranny
Sastsangocauze charanni
Prannipatu maza. 2.
Tuzea Deuaputrache varodina
Maza deuoalge mati gneana
Tuze crupestauae tangaine
Sancto Antonichy catha. 3.
Magi Portugala ragedasi
Lixboa mhannipe yeca nagarasi
Sancto Antonio ghenmasi
Apula ieuaftezni. 4.

Hca

सांतु आंतोनिची जीवित्वकथा

( पहिलें पृष्ठ )

# सोळाव्या किंवा सतराव्या शतकांतील मिशनऱ्यांच्या हातचें मराठी टांचण



Sri Queshăuâyĕ nămă । Zennẽ Gocullă pâllilẽ । Gouărdhănâthẽ dhări=
lẽ । Gopicâthẽ rămăuilẽ । gunnẽ căruni । 1 । vishuâthẽ rachitâ ।
vishuă âpănnăchi pâllitâ । vishuă sănhâruni mâgutâ । ure vishă=
rupu । 2 । Deuăquye udhări văhilâ । Dăffămătiẽ pâllilâ । Durio=
dhănâchâ văiry zăhâlâ । Drupădie cârănnẽ । 3 । Aissâ ti ăqueri ।
vistârălâ chărâchări । teâ Gurucheâ chărănnâ vări । nămăscâru
mâzâ । 4 । Gurună deuŏ dâuilâ । mhănnăuni Guruchi Deuŏ mâ=
nilâ । zăiffâ Deuŏ tăiffâ bhâuilâ । yecă suărupẽ । 5 । Guru măitră

## जेजुइट पाद्री आंतोनियु द सालदाञ-विरचित

## पादुवा[1] म्हळल्या[2] शारांतुल्या[3]

# सांतु[4] आंतोनिची[5] जीवित्वकथा

नमन माजें[6] परमेस्परा[7] : स्वर्गस्रुस्टिचेआ[8] रचणारा
क्रुपाशेंधु[9] करुणाकरा : मुग्तिराया[10] १
नमो मरिये[11] स्वामिणी : तूं स्वर्गासंसाराची[12] राणी
सास्टांगें तुजां[13] चरणीं : प्रणिपातु माजा २
तुजेआ[14] देवपुत्राचें वरुदान : मज देववीजे मतिग्न्यान[15]
तुजे क्रुपेस्तव सांगैन : सांतु आंतोनिची कथा ३

---

१ Padua-इटालीमधील एक शहर. २ म्हटलेल्या (नांवाच्या)-हा शेरा गोमंतकी बोलींत आहे. ३ शहरांतल्या. ४-५ संत अँटनीची Saint Anthony-जन्म ११९५-मृत्यु १२३१. पोर्तुगालमधील हा अत्यंत लोकप्रिय संत असून त्यानें पुष्कळ लोकोत्तर चमत्कार केल्याचें नमूद आहे. Santo Antonio de Lisboa म्हणजे 'लिस्बनचा संत अँटनी' म्हणूनही तो प्रसिद्ध आहे; परंतु पुष्कळ काळ पादुवा येथें धर्मप्रचार करीत राहिल्यामुळें 'पादुवाचा संत अँटनी' असें त्यास नांव मिळालें. या पुस्तकाच्या पहिल्या भागांत त्याचे चमत्कार गोमंतकी बोलींत गद्य स्वरूपांत वर्णिले असून पुढे ग्रांथिक भाषेंत ओवीबद्ध चरित्रकथन आहे. ६ माझें. झ बद्दल जुन्या काळीं 'ज'ही वापरण्याची पद्धति होती. ७ परमेश्वरा. 'स्व' किंवा 'श्व' बद्दल 'स्प' उच्चारण्याची जुनी पद्धति होती. सरस्वतीबद्दल 'सरस्पती' असा कोंकणांत अद्याप शब्द प्रचलित आहे. ८ स्वर्गसृष्टीच्या. ऋ बद्दल रु किंवा रि आणि श् बद्दल स् किंवा स् बद्दल श् उच्चारण्याची किंवा लिहिण्याची जुन्या काळीं वहिवाट होती असें जुन्या ग्रंथांचीं हस्तलिखितें किंवा काळजीपूर्वक मूळ हस्तलिखितांवरून मुद्रित केलेले ग्रंथ पाहिले असतां दृष्टोत्पत्तीस येतें. अशीं रूपें पुढें पदोपदीं आढळतील. ९ कृपासिंधु. १० मुक्तिराया. जुन्या मराठी ग्रंथांत वरील-प्रकारचीं रूपेंहि आढळतात. पहा :—'**माझें वग्नुत्व लोह हें उणें**,'-मुक्तेoआदि. अ. १-८२. ११ Mary. १२ स्वर्ग व पृथ्वी यांची. १३ पुढील नाम सप्तमींत असल्यास आधील सर्वनामाच्या अंत्याक्षरावर अनुस्वार येतो असें आपणांस इतर जुन्या हिंदु मराठी ग्रंथांतही आढळतें. १४ Tuzea या रोमन लिपींतील शब्दाचें देवनागरी लिप्यंतर तुजेआ किंवा तुज्या असें करतां येईल. पुढें ओ. ५, टी. ३ पहा. १५ मतिज्ञान.

मागां पोर्तुगाल राज्यदेसीं : लिस्बोअ[1] म्हणिपे[2] येका नगरासीं
सांतु आंतोनियु घरवासीं : आपुलां निजस्थानीं ४

ह्या देवभग्ताचेआ पितेयासि : मार्ति द बुल्योइंस् नाम तेयासि
आणी तेआचे[3] जननियेसि : दॉन तारेझ्य द ताव्हैर ५

से[4] म्हणिपे स्रस्टी[5] इग्रजेपासीं[6] : तीं उभयेतां होतीं घरवासि
वाप्तिझार[7] केलेआ[8] सांतु आंतोनिसि : नाम ठेविलें फेर्नांदु ६

तंव तियेचि स्रस्टी इग्रजेचा स्थानीं : सांतु आंतोनि लहानुवेरि निगोनि
लिहित अखर पठण करोनि : पाठु[9] जाहाला ७

आपुले मातेचेआ दुद[10] पिवनासगी[11] : स्वामिणिची भग्ति निरांतरि[12]
तेआ देवभग्तें शेविली[13] उधरीं[14] : दुदपान जैसें ८

तेयासि आसातां बाळपणिची वयेसा[15] : बुधीपासौनि[16] व्रधासरिसा[17]
गंभीरपणें बुधीप्रकाशा : चालिला नित्य ९

१ लिस्बन - पोर्तुगालची राजधानी. २ म्हटल्या जाणाऱ्या. पहा–**मध्याजी म्हणिपे चोख ।** - ज्ञा० ९–५१३ ३ Teache. तयाचे, तेआचे, किंवा त्याचे अशीं-हीं रूप आढळतात. तेयाचे बद्दल Teyache असें कवि लिहितो. Teache याचें लिप्यंतर तेआचे किंवा त्याचे असें करतां येईल. तेआचें (किंवा तेयाचें) असें रूप महानुभाव वाङ्मय किंवा राजवाडे यांच्या ज्ञानेश्वरींत आढळतें. 'त्याचें' असें आढळलें नाहीं. त्यावरून तें आधुनिक वाटतें; परंतु चोंभ्याच्या उपाहरणांत 'त्याचा' (६४७), 'ज्याचे' (८१२) 'त्याचा' (१०८६) अशींही रूपं क्वचित् आढळतात. राजवाडे किंवा मूळ उपाहरणाची नक्कल करणारा यांचा जर हा हस्तदोष नसेल तर अशीं रूपें जुन्या काळीं वापरांत होतीं असें मानावें लागेल. ४ Se (पोर्तु.) - मोठा चर्च. ५ श्रेष्ठ. ६ Igreja (चर्च) च्या जवळ. ७–८ बाप्तिस्माचा विधि केल्यावर. ९ पारंगत (?). १० दूध. अल्पप्राणाबद्दल महाप्राण व याच्या उलट अक्षरें वापरण्याची जुनी पद्धति आहे. ११ पिण्याप्रमाणें. १२ निरंतर. १३ सेविली. ओ. १, टीप ८ पहा. १४ उदरीं. वरील टीप १० पहा. १५ वय, आयुष्य. पहा–**कीं प्रथम वयसाकाळीं,** - ज्ञा. १–४२. १६ बुद्धीपासून. अशीं रूपं जुन्या हिंदु ग्रंथांतही फार आढळतात. पहा : **ऐसी काहीं नुपजेची बुधी ।** - उपाहरण ओ० ३२; **उधरीन तुझें कुळ ।** - उपा० ७००. १७ वृद्धासारखा.

फुडां[1] आपण हिये संसारीं : वर्तणारु होंता जेणेपरी
ती गुणप्रकृति लोकांतरिं : दावित होंता १०

ऐसेआं सुल्खेणांचेआं[2] प्रकारीं : ता[3] वर्तत आसतां संसारीं
प्रांय[4] बाणली तेआचां शेरिरीं[5] : वरुसां पनरांचि[6] ११

तेआचे सम वयेंसचे कुमर : तारुण्यधातुचे[7] आणियेक येर
संसारसुखासि आपुले नेत्र : उगडिति नित्य १२

संसारभोगाची फरारी[8] : तेहीं भोगावेया हिये संसारीं
शेरिरधातु तयावरि : चालवावेया १३

तदीं तिये प्रायेचे वेळे : या भगताचेआ आत्म्याचे डोळे
उगडें केलीं नेत्रकमळें : देवभग्तीठाईं १४

येरि वाइटिव[9] नेदेखावेया डोळां : आणि आपण येकादे वेळां
तियेचि वाइटिवेचेआं भवजाळां : पडेन म्हणोनि १५

१ पुढां. महाप्राणाचा (aspirate) असा विपर्यय जुन्या मराठी वाङ्मयांत अन्यत्रही दिसतो. **न न्हाये** ( राहे ) **तरि घालावें मोकलुनी** । पहा-ज्ञा. ६-३८०. २ सुलक्षणांच्या. ३ तोबद्दल 'ता' व जोबद्दल जा असीं रूपें तोमास स्टिफन्स, क्रुवा वगैरे जेजुईट कवि विकल्पेंकरून वापरतात. राजापूरकडील मुक्तेश्वरी आदिपर्वाच्या एका हस्तलिखित प्रतींत असा प्रयोग अनेक ठिकाणीं आढळला. त्यावरून जुन्याकाळीं असें रूप प्रचलित होतें, अशी शंका येते. राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरींत **'अवधारीं मग ता अर्जुनु'** (अ. १-४) असें रूप आढळतें. पण पुढं शुद्धिपत्रांत 'ता'-चें तो केलें आहे. कवीश्वर भास्कराच्या शिशुपालवधांतही **'कंसा जा नृपभातु :'** असें रूप आढळतें. (ओ. ४३८.) ४ वय, दशा. ('पराय' किंवा 'पिराय' असाही हा शब्द रूढ आहे.) पहा:—**तऱ्ही जो करी प्रायेचा आवेशु** ।-ज्ञा. १३-७५६. ५ च, ज, य, श, क्ष याबद्दल अनुक्रमे चे, जे, ये, शे, क्षे अशींही जुन्या मराठी हस्तलिखितांत अक्षरें आढळतात. ( उदा० चेरण, पराजेय, नयेन, शेरण, लक्षेण ) ६ पंधराची. ७ रक्त, मज्जा, वसा, मांस, अस्थि, मेद व रेत हे शरीराचे घटक. ८ ओढ, वासना. पहा-**जीविताची फरारी । देखौनि जो न करी । मृत्युचिंता** ।-ज्ञा. १३-७३५. ९ वाईटपणा. पहा-**सानीव धरुनी अंगीं** । -ज्ञा. १-४६; **जें धीटीव करूनि भवादृशां** ।-ज्ञा. ९-२३.

ऐसा तेणें मनीं करोनिया विचारु : मग आठविला येकु प्रकारु
म्हणे येकुचि अढळु मुस्तेरु[१] : आहे मज १६

तियेचि लिस्बोअ नगरीं परिकरु[२] : सांव[३] व्हिसेंतिचा[४] स्रस्टु[५] मुस्तेरु
होता किर्तिवंतु माहाथोरु : सांतु[६] आगुस्तिनिचे[७] ओर्दिचा[८] १७

तेया स्रस्टु मुस्तैरा आंतु : पर्वेसोनि[९] सांतु आंतोनियु देवभग्तु
तियेचि ओर्दिचा घेतला आबितु[१०] : सदैव[११] भग्तें १८

मग प्रोफिसांव[१२] केलेआ उपरि : माहा लिगत्व धरोनि शेरिरीं
क्रमविलि दोनि वरुसांवेरी : तेया मुस्तैराआंतु १९

तंव तो माहा सुलखेणिकु[१३] होउनु : पुण्यवंति जीणि[१४] क्रमउनु
देवभग्ति चिंतन करुनु : क्रमवी दिवस २०

ऐसा सदैव भग्तु वर्ततां तिये स्थानीं : तेथ तेआचे सोहिरे समंदी[१५] येउनि
आडखळु[१६] करिताति देखोनि : देवचिंतनासि २१

आपुलेआ आत्म्याची मुग्तिची जोडि : ते जोडूं न नेदेति दिसवडि
येतां जातां घडी घडी : अंतरविति देखोनु २२

मग तेआं जंत्रळिचा निगोनि : दुरस्त राहिन म्हणउनि
ऐसा निर्धारु आपुलां मनीं : केला तेणें २३

१ Mosteiro (पोर्तु.), मठ (monastery). २ सुंदर. ३-४ Saint Vincent. ५ श्रेष्ठ. ६-७ Saint Augustine. ८ धर्मपंथाचा (order). ९ प्रवेशोनी. १० Habito (या शब्दांत h चा उच्चार पोर्तुगीजमध्यें होत नाहीं.) पेशा, वर्तनक्रम. ११ दैववान, भाग्यशाली. पहा–**देखा कामधेनु ऐसी माये। सदैवां जेया होये।**–ज्ञा० ५–१०. १२ Professão (पोर्तु०), दीक्षाग्रहणविधि. १३ ओ. ११, टी० २ पहा. १४ जीवितक्रम. १५ संबंधी, आप्त. १६ (गोमांतकी बोलींतील शब्द) आडकाठी, अडथळा.

तंव मुस्तैराचेआ स्रस्टार्थे[1] विनउनु : तेयापासीं अनुग्न्या मागुनु
निगाला तेआचा निरोपु घेउनु : कोइंब्र[2] नांवें नगरीं २४

तेथ सांत क्रुसाचेआ मुस्तैराभितुरीं : प्रवेसोनि तिये अवस्वरीं[3]
देवभग्ति चिंतन निरांतरीं : कथन करोनि होता २५

फुडां सां. आंतोनियु वर्ततां तिये स्थानीं : शास्त्रपठण करी अनदिनि[4]
पाठु[5] जाहाला तेयापासौनि : सुमूर्ति[6] ठाईं २६

नित्य पुण्यजिवित्व क्रमउनि : सांतु आंगुस्तिनिचेआ मुस्तैरास्थानीं
तेथ राहिला काळ क्रमउनि : केती[7] दिवस वरुसें २७

ते काळीं रेलिजिओज[8] पांच जण : सांव[9] फ्रान्सिस्काचे[10] ओर्दिचे जाण
घेउनि आपुलेआ स्रस्टीचें[11] निरोपण : येउनि ते पांचै २८

तेआचि कोइंब्र नगरांतुनु : ते पांचैजण क्रमउनु
तेचि दिवसीं जांत होते निगुनु : तिये पंथीं २९

मारॉकॉस्[12] म्हणिपे येक पाटणपुरीं[13] : उदंड[14] मिलंछे[15] जनां मोहरीं[16]
निगोनि प्रवेसलेआवरि : ते पांचै रेलिजियोज ३०

तंव थोरु अखेपु[17] मनीं धरुनु : देवशास्त्रकथन आरंभुनु
सांगते जाहाले अर्थु करुनु : मिलंछे जनार्थे ३१

---

१ श्रेष्ठातें. (Superior). ‘तें’ प्रत्ययाबद्दल ‘थें’ लिहिण्याची प्रवृत्ति जुन्या हिंदु ग्रंथांतही आढळते : **रणी आर्धी तुथें हाणे ।** – उषा० ६०९. २ Coimbra. पोर्तुगालमधील एक प्रमुख शहर. तेथील विश्वविद्यालयाबद्दल प्रसिद्ध आहे. ३ अवसरीं, प्रसंगीं. ४ अनुदिनीं. ५ पारंगत. ओ. ७, टी. ९ पहा. ६ स्मृति, धर्मशास्त्र. ७ किती. पहा–**केती त्राय करिसी या उग्ररूपा ।** –ज्ञा. ११–४३८. ८ Religioso (पोर्तु.) मठस्थ, धर्मपंथी. ९-१० Saint Francis. ११ Superior. ओ. २४, टी. १ पहा. १२ Marrocos (आफ्रिकेमधील शहर) १३ मुख्य शहर. १४ पुष्कळ. १५ म्लेंछ. १६ पुढें. १७ आक्षेप, आग्रह, नेट.

शास्त्रसुमुर्ति[1] कथन करुनि : हें शास्त्र सत्यवंत म्हणोनि
तेहीं दाविलें प्रघटउनि : बहुतां ठाईं ३२

कथन करुनि जनाप्रती : तेआचि देवशास्त्रा निमितीं
शास्त्रद्रुहितांचां[2] हस्तीं : वेंचले[3] प्राणें ३३

तंव पोर्तुगालाचेआ न्रुपंत्ररासि[4] : येकु दुजा बंधौ[5] होंता तेआसि
दों[6] पेद्रु[7] नाम तेआ बंधुसि : होंतें जाणा ३४

तेणें तेआं पांचांचीं प्रेतें आणोनि : कोइंब्र नगरांतु नेउनि
सांता क्रुसाचेआ मुस्तैरीं स्थापुनि : पतिस्टा[8] केली ३५

मग तेआं पांचाइ रेलिझिओजां वरउनि : देवें स्वामियें दिनेंदिनीं
जिं अपुर्वें[9] दाविलीं करोनि : लोकामाजि ३६

ती तेथिल अपुर्वता सविस्तरि : फ्रै[10] फेर्नांदें आइकिलेआ वरि
मग तो काये आपणेआ भितुरि : बोल्ता जाहाला ३७

धन्य ते रेलिझिओज सकळ : धन्य तेआंचें जल्म सुफळ
प्राणु वेचिला भुमंडळा : देवशास्त्रापासौनि ३८

मार्तिरिय[11] मकुटु[12] तेआंचां सिरीं : तेयांसि लाभला मुग्तिनगरीं
तैसेंचि सदैव[13] जोडलें तरि : मि होंतों सदैवु[14] ३९

तेणें माज्या भग्ताचा अंतु : न करवे होंता संसारा आंतु
ऐसें चिंतुनु आपुलेआं मनांतु : आरतु[15] जाहाला ४०

तेआं सदैवां पांचाइ रेलिझिओजांसि : जैसा मार्तिरिय मकुटु लाभला तेआंसि
तैसा जोडावेया आपणेयासि : प्रख्यांतु[16] होए ४१

---

१ शास्त्रस्मृति. २ क्रिस्ती धर्माच्या द्रोह्यांच्या (शत्रूंच्या.) ३ खर्चिले. ४ नृपवरास. ५ बांधव. ६ एक पदवी. ७ पीटर. ८ प्रतिष्ठा, स्थापना. ९ चमत्कार, पूर्वी कधींही न घडलेल्या आश्चर्यकारक गोष्टी. १० Frei (पोर्तु.) Friar, मठस्थ. ११ Marteria (पोर्तु.), हुतात्म्याचा. १२ मुकुट. १३ सुदैव. १४ ओ १८, टी. १० पहा. १५ उत्सुक. १६ प्रख्यात (?)

तेआचि कोइंब्र नगरा बाहिरु : होता सां फ्रांसिस्काचा मुस्तैरु
माहा महिमेचा परिकरु : सांत आंतांव नांविचा ४२

तेआ मुस्तैराचे रेलिजिओज् काहीं : सांत क्रुसाचेआ मुस्तैरा ठाईं
पातले होंते तिये समहीं[1] : मागावेया धर्मु[2] ४३

फुडां तेयां रेलिझिओजां जनार्थे : सांतु आंतोनि भेटोनि तेथें
जें आपुलें आरत[3] जिवीं[4] होंतें : तें निरोपिलें तेयां ४४

आपुले जिविंचें मनोरथ : जें तेआं सांगितलें येथार्थ
तें तेयां मानलें[5] समेस्त : रेलिजिओजांसि ४५

तेआंचेनि मनोरथें करुनु : मुस्तैराचेआ बुधवंता[6] सांगुनु
आपणेआसि निरोपु घेतला मागुनु : सांत्र फ्रांसिस्काचा आबितु[7] घेआवा ४६

तेणे तेआसि निरोपु दिधला पण : देखोनि फेर्नांदाचे उतम गुण
दुखवलें तेयाचें अंतकरण : ता[8] निगताये[9] देखोनि ४७

म्हणे फेर्नांदा सारिखा कवणु : ऐसा आणियेकु नाहीं सुलखेणु
ता निगालेआ येथहोउनु : मुस्तैरा आंतुनु ४८

अमोलिक भांडार—ठेवणी : जैसी गेलेया अंतरुनि
तैसा गेलेया सांतु आंतोनि : सांडोनि येथें ४९

अमोलिक रत्नाचें भांडार : येथोनि गेलें होयेल दुर
म्हणोनि संताप थोर : करी तेयाचे ५०

पण फ्रै फेर्नांदाचें चित[10] : आपण न करावेया दुस्चित[11]
आपसंतोसाविण दिधला तेथ : जावेया निरोपु ५१

१ समयीं. २ भिक्षा. (!) गोमंतकात आजही क्रिस्ती भिकारी ‘भिक्षा घाला’ म्हणावयाचे ऐवजीं ‘धर्म वाढा’ असे म्हणतात. ३ इच्छा. ४ मनीं. पहा–**जीवीं द्रव्याशा बाह्य विरक्ति।** –एकनाथी भागवत, २७, १५७. ५ पसंत पडलें. ६ मुख्याधिकारी. ७ ओ. १८, टी. १० पहा. ८ ओ. ११, टी. ३ पहा. ९ निघताहे. पहा–**जातु पाहातांये पाठीमोरा,** –उषा० ९०६. १० चित्त. ११ खिन्न.

फुडां फेर्नांदु निगतां बाहिरि : जे रेलिजियोज होंते तेआ मुस्तैरीं
ते गर्हिवरले भोउतां[१] परि : तेयास्तव ५२

म्हणती हा येती[२] काळ्वेरीं : वर्तोनि होंता आमां[३] सरी[४]
तेयाची वाइटिव कधांतरीं[५] : नाहीं देखिली आमीं ५३

भग्तीठाईं भग्तिवंचळु[६] : पुण्या ठाईं माहा पुण्यसिळु[७]
बरवियां करणियां ठाईं निर्मळु : सदैवु प्राणी ५४

ऐसें ते रेलिझिओज बोल्ती : फ्रै फेर्नांदासि संतापती
जिवीं माहा गर्हिवर करिति : ता निगताये देखोनि ५५

तंव तेआ रेलिझिओजां भितुरि : येकु रेलिझिओज तेआसि चकाट[८] करी
अगा फ्रै फेर्नांदा झडकरीं : जाईं जाईं तूं ५६

घेतलेआ सांव फ्रांसिस्काचा आबितु : सिघ्र[९] वेगां होंसिल गा भग्तु
वायां वेळु न लविजे[१०] बहुतु : जावेया तुवां ५७

फ्रै फेर्नांदु म्हणे माजेआ बंदवा[११] : मीं भग्तु जाहालां ऐसा तुवां
ता माजा व्रुतावंतु[१२] सुटावा : आइकिलेआ वरि ५८

संतोसु करि आपुलेआ मना : देईं स्वामियासि अर्गेदानां[१३]
ऐसें दिधलें शात्विक[१४] वचन : फ्रै फेर्नांदें तेआ ५९

तेणें सांव फ्रांसिस्काची ओर्दि[१५] : आपणआसि घेतली जदीं
सोविसां[१६] वरुसांची प्राये[१७] तदीं : लोटिली तेया ६०

---

१ बहुतां. ओ. १०, टी० १ पहा. २ इतुका. ३ आम्हां (गोमंतकी रूप). ४ बरोबर. ५ कधींही, कदांतरी. ६ भक्तिवांछाळ, भक्तीची इच्छा करणारा. ७ पुण्यशील. ८ बोलणें, भाषण. ९ शीघ्र. १० लाविजे. आधीं नकारदर्शक न आला तर पुढील क्रियापदाच्या पहिल्या अक्षरांतील आ बद्दल अ होतो, हा नियम यानें पाळिला आहे. ११ बांधवा. १२ वृत्तांत. १३ अर्घ्यदाना. १४ सात्विक, ओ. ८, टी १३ पहा. १५ Order, पंथदीक्षा. १६ सव्वीस. १७ वय.

तो फ्रै फेर्नांदु आसतां तेथ : दिवस क्रमविले बहुत
तियेचि ठाईं राहावेया तेआचें चित : न्हवतें तदीं ६१

आपुले सोहिरे समंधी जन : मैंत्र[1] वोळखिचे स्वजन
भेटावेया येंताति अनदिन : म्हणोनियां ६२

तेयांचे येरजारीनिमितीं : खोळंबे आपुली देवस्तुति
ऐसें देखोनि आली बहुती : उबगि तेया ६३

तंव तें चुकवावेया कारणें : येकु उपावो मनीं पाहिला तेणें
नांव पाल्टावेया कारणें : चिंतिलें तेहीं ६४

कोठां राहिलां आहे आपण : ऐसें न गमावेया[2] कवणा
नाम पालटिलें जाणा : आपुलें तेणें ६५

सांतु आंतोनिचे भग्ती पासौनु : फेर्नांदु नांव सांडुनु
आंतोनियु ऐसें म्हणउनु : घेतलें नाम ६६

मग तो सदैवु दिवसें दिवसीं : चिंतित होंता आपुलां मानसीं
मार्तिरिअ[3] मकुटु[4] आपणेआसि : लाभावेया ६७

आपुलेआ बुधवंतार्थे[5] विनउनि : आपणेआसि निरोपु घेतला मागुनि
बाहिर निगावेया तेथौनि : आफ्रिका देसीं ६८

तेआ बुधवंतें जाणितलें चितीं : हा मिलंछे जनलोका प्रती
स्वामिया देवाची शास्त्रसुमुर्ति[6] : कथिल म्हणोनि ६९

म्हणउनि तेआचि कृत्या कारणें : आपणेआसि आबितु[7] घेतला तेणें
ऐसें जाणितलें अंतकरणें : तेआ बुधवंतें ७०

फुडां निगावेया आफ्रिका देसीं : तेआ सदैवा भग्ता आंतोनिसि
तेणें निरोपु दिधला तेआ दिवसीं : निगावेया तेथें ७१

१ मित्र. २ कळावया. ३-४ हुतात्म्याचा मुकुट. ५ मठाधिपतीस, प्रमुखास. ६ ओ. २६, टी० ६ पहा. ७ ओ. १८, टी० १० पहा.

फुडां ता भगतु आफ्रिकांतरीं : पावत आसतां जंवळिसरीं[1]
पिडा उपजली तेआचां शेरिरीं : देवें निर्मिलेंआस्तंव ७२

तंव इस्पान्ज[2] देसा परतोनि : जावें पडलें तेथहोउनि
आपणेआसि प्रणामु[3] होइल म्हणोनि : तिये ठाईं ७३

निगावेया इस्पाञ्ज देसांतरीं : चळगला[4] येका तारुवा वरि
काये जाहालें तिये अवस्परीं : निगतां तेया ७४

वाह्यु[5] मोडावा[6] उठिला निस्टुरु : तेणें उचंबळला साघरु[7]
पाळां[8] सरिसें लोटुनि गेलें तारूं : आणियेके देसीं ७५

चालतां लोटतां माहा लाहारीं[9] : सिसिलिअ[10] राज्यदेसिंचे तिरीं
पैंठे पातलें ते अवस्वरीं : परिवाण[11] तेआचें ७६

सदैवु भगतु सांतु आंतोनि : तेआ तिरीं पावतां उतरोनि
सदैवा सांतु आंतोनिचां मनीं : ठाउकें जाहालें ७७

आपुला गुरु सां[12] फ्रांसिस्कु[13] भगतु : आसीस्[14] म्हणिपे तेआ नगरांतु
आपुलेआ आणियेकां फ्रादींसहितु[15] : मेळोनि तेथें ७८

तेआं दिवसांतरीं राहुनि तेथ : कापितुलु[16] जेराल[17] असे करित
ऐसें जाणितलें येथार्थ : तेआ देवभगतें ७९

तंव वेरि तेआ सदैवासि : प्रणामु न होंता जिवासीं
तरिइ निगाला तेआचे भेटेसि : सां फ्रांसिस्का पासीं ८०

---

१ जवळपास. २ Espanha (पोर्तु.), स्पेन. ३ सुपरिणाम (Cure), आरोग्यप्राप्ति. ४ चढला. ५ वारा. ६ वादळ (मॉड-गोमंतकी). ७ सागर. ८ लाटां (?). ९ लहरीं, लाटांनीं. १० Sicily, भूमध्यसागरांतील एक मोठें बेट. ११ परिवाहन (?), जहाज. १२–१३ Santo Francisco (११८२–१२२६) : फ्रान्सिस्कन मठाचा संस्थापक. १४ Assis. १५ Frade (पोर्तु.) फ्रान्सिस्कन संघबंधूसहित. १६–१७ Capitulo Geral (पोर्तु.), कॅथलिकांचा एक धर्मविधि.

मग येरां फ्रादीं समागमीं : गुरु सां फ्रांसिस्कासि विनवुनि
आसवचन[1] घेइन म्हणउनि : निगाला तेथें ८१
कापिताल्लु जेराल केलेआवरि : सकळ रेलिझिओज ते अवसरीं
जात्रेया आपापुले मुस्तैरीं : निगणार ते ८२
तंव सांतु आंतोनियु देवभग्तु : देखोनि अशेग्तु[2] पीडावंतु[3]
तेआं रेलिजिओजांचेआं मनांतु : भासलें येक ८३
तो न्हवे[4] लिहितेसीं पाठु : अथवा चालिवोलीं न्हवे धिटु
नुसुधाचि[5] टोंबा[6] सराटु[7] : ऐसें वाटलें तेयां ८४
आणी कवणाइ येका कृत्यासि : तो न घडेल उपेगासि[8]
ऐसें तेहीं आपुलां मानसीं : भासोनियां ८५
आपणेआ सवें येइ म्हणउनु : अथवा शेब्दा आधारु देउनु
बोलावी ऐसा नाहीं जाहाला कवणु : तेयां माजि ८६
तंव येकु ग्रासिआनु[9] म्हणउनि : पाद्रि होंता पुण्य प्राणी
रोमानांचां मुस्तैरिसिरोमणी : प्रोव्हिंसियाल[10] तो ८७
सांतु आंतोनिन तेआ पाद्रीप्रती : तेवां प्रार्थना केली बहुति
मज न्यावा तुमा सांगातीं : म्हणोनियां ८८
देखोनि तेआचें लिणंत्वपण : दरवलें[11] प्रोव्हिन्सिआलाचें अंतकरण
तंव मिनिस्तु[12] जेरालाचे[13] अनुग्नेन[14] : सवें नेला तेयासि ८९
सवें नेउनु तो देवभग्तु : मोंति[15] द[16] पावला[17] मुस्तैरा[18] आंतु
राहावेया पाठविला त्वरितु : तेआ ग्रासियानें[19] ९०

१ [ आशीवर्च्चन. ] २ अशक्त. ३ आजारी. ४ नव्हे. ५ नुसताच, केवळ. ६ मठ्ठ, मंदबुद्धि. ७ वेडा. ८ उपयोगास. पहा : **तरी एथ आलेआ कवण उपेगु** ।–शिशुपालवध १८२. १० ओ. ११, टी. ५ पहा. ९ Graciano (एक नांव). १० Provincial (पोर्तु०), धर्माधिकारी. ११ द्रवलें. (स्वरभक्ति). १२–१३ एक वरिष्ठ धर्माधिकारी. १४ अनुज्ञेनें, परवानगी घेऊन. १५–१८ Monte de Paul नांवाचा मठ. १९ वर टी. ९ पहा.

सांतु आंतोनियु आसतां तेआ मुस्तैरीं : नित्य देवध्यान चिंतन करी
ऐसें करोनिया निरांतरीं : वर्तत होता ९१

प्रास्चित[1] करावेया दिवसा दिवसा : होये तियेचि उभराभरी[2] सरिसा
तेयासि खाणाजेवणाची आसा : थोडिचि होंती ९२

येकुचि उंडा[3] दिसवडी शेउनु[4] : आपणेआसि जिवनपिवन करुनु
देहदंडणा केल्या पासउनु : अरोग्तु जाहाला ९३

निरोग्त होउनि हस्तपाये : माहा संकस्टीं उभा राहे
येकदां प्राणु चाचुरी[5] जाये : तेया भग्ताचा ९४

लिहित[6] अखेराचें[7] पठण : अभ्यासला असे आपण
आणी लिहिताचें अनुवदण : जाणे म्हणउनि ९५

हें आपुले मनिचें वर्म काई : कवणा न संगतां ते समई
आसतां तेआ मुस्तैरा ठाई : येणे प्रकारीं ९६

लिणत्व म्हणियें[8] आपणेआसि घेउनु : शेवा म्हणियें करी अनदिनु
वस्त्रें लुगडीं दे प्रख्याळुनु[9] : येरां रेलिजिओजांचीं ९७

आणी मुस्तैराचे ठाये[10] झाडी : नित्य भाणि[11] उचिस्टें काडी
ऐसें म्हणियें करी दिसवडी : तिये ठाईं ९८

सदैवु सांतु आंतोनियु येणेपरी : वर्तत आसतां तेआ मुस्तैरीं
तेथ काहीं येक रेलिझिओज गेलेआवरि : ओर्दि[12] घ्यात्रेआ पाद्रिपणाची ९९

---

१ प्रायश्चित ( Penance या अर्थी ). २ दाटी, गर्दी; स्टिफन्सही हा शब्द वापरतो : **दोसांचो उचारिन उभराभरि । सासेर्वोती फुडां ॥**– क्रि० पु० २, ३७–६४. ३ पाव. ४ सेवून, खाऊन. ५ झोकांड्या, पहा :–**चांचरी जात सुपर्ण। महाद्वारीं पडे मूर्च्छा येऊन ॥**– हरिविजय. ३१–२४. ६–७ लिहिताक्षर ( Scripture–बायबल ? ). ८ सांगितलेलें, आज्ञापिलेलें : **आजी कां वो तूं दिससी दुश्चिती । म्हणियें काम नलगे तुझ्या चित्तीं ।** –तुका० १११ ( चित्रशाळा ). ९ [ प्रक्षाळुनि ] धुऊन. १० जागा. ११ ताटें. १२ दीक्षा.

फुडां मुस्तैराचे बुधवंतें[1] : हेआ सदैवा देवभग्तार्थे
पाठविला तेआं रेलिझिओजां सांगतें[2] : फ्लोरी[3] नगरीं १००
सांतु आंतोनियु पातलेआ तिये ठाईं : सां दोर्मिंगाचे रेलिजिओज[4] काहीं
तेथें गेले होंते तिये समहीं[5] : निगोनियां १०१
येकत्र आसतां ते रेलिजिओज समेस्त : भोजनाचा समयो जाहाला तेथ
तंव काये जाहाला बोल्त : मुस्तैराचा बुधवंतु १०२
आगा तुमां फ्रादीं भितुरीं : येकादा पाद्रि हे अवस्वरीं
शास्त्रपठण लोका अंतरीं : करा येथ १०३
ऐसें आइकोनि तेयाचें वचन : उतर[6] नेदी जाहाले कवण
करिताति शेब्दांचें टाळण[7] : निब[8] देउनियां १०४
म्हणती अमां माजि कवण : करोनि शास्त्राची आठवण
येथ आले नाहीं पठण : करोनियां १०५
ऐसें निबवचनें बोलुनु : म्हणति भांजडा[9] देउनु
आमीं आलेउं सामग्रिये वांचुनु : म्हणोनियां १०६
तंव सदैवु भग्तु सांतु अंतोनीं : आपुलेआ बुधवंतें निरोपिलें देखोनि
काये बोल्ता जाहाला उठोनि : सकळां मोहरीं[10] १०७
अहो मीं फ्रादींचे लिण[11] व्यापार : करोनि राहिला होंता निरांतर
बहुतेक लिहित अख्यर[12] : पठलों नाहीं १०८
इतुकें वचन बोलिलाइ तरि : तेआ बुधवंतें निरोपिलेआ सरी[13]
शास्त्रकथन तिये अवस्वरिं : करिता जाहाला १०९

---

१ मुख्य. २ बरोबर. ३ Flores—स्थलनाम. या नांवाचीं नगरें युरोपांत अनेक ठिकाणीं आहेत. ४ धर्मपंथी. ५ [ समयीं ]. ६ [ उत्तर ]. ७ टाळाटाळ, उडवाउडवी. ८ सबब. ९ Bhanzadda या शब्दाचा अर्थ पाद्री दियोगु रिबैरु याच्या १६२६ च्या कानारीं कोशांत ' छपवाछपवी किंवा बेपर्वाई ' ( dissimular, nao fazer caso ) असा दिला आहे. १० पुढें, समोर. ११ [ लीन ]. १२ [अक्षर]. १३ प्रमाणें.

तेआचें शास्त्र माहा उतम : मिस्तेरियांचें[1] अती अगम
लोकु आइकती माहा संभ्रम[2] : धरोनि जिवीं[3] ११०

परिसोनि तेआची शास्त्रसुमुर्ति[4] : स्नेहें लोकु मनीं दरवती[5]
माहा अतोज[6] जिवीं पावती : विस्मित होउनि १११

ऐसा सांतु आंतोनिचा वुतावंतु[7] : आइकोनि साउं फ्रान्सिस्कु देवभग्तु
संतोसु पाउनि आपुलेआं मनांतु : जाणितलें तेणें ११२

सांतु आंतोनी सदैव भग्तासि : बहुजनांचेआ बरवेआ कृत्यासि
देवें वेंचोनि ठेविला तेयासि : म्हणोनियां ११३

शास्त्रकथन करावेया जनार्थें : आणी सकळां यैरां रेलिझिओजार्थें
थेवोलोजीची[8] पठणा[9] तेयांथें : करावेया ११४

तेयासि अनुमानिला[10] मनीं : आणी बरवा अक्षेपु[11] धरोनि
शास्त्रपठण अनदिनीं[12] : करावेया कारणें ११५

जेथें होता भग्तु सांतु आंतोनि : तेथें आपुलां नांवीं पत्रिका लिहुनि
पाठविली तेथहोउनि : तेया भग्तासि ११६

तिये लिहित पत्रिकेची विमग्ति[13] : तेणें लिहिली कवणिये रिती
ती लिहणी परियेसा समस्ती : सुते तुमीं ११७

---

१ Mysterios (पोर्तु.) गूढ धर्मतत्त्वांचें. २ आवड, प्रेम. पहा– **टाकुनि इंद्राचा संभ्रम। धरिसी कां नळभ्रम।**–रघुनाथपंडित (द. स्व.) २२७; **संभ्रमें अभिमन्यूच्या लग्ना। अंगें पातला यादवराणा।**–मुक्ते. विराट० ७–११६. ३ मनांत. ४ शास्त्रस्मृति. ५ द्रवती. ६ [अचोज] च बद्दल त. पहा— **अट्ठेतालिसावा पुरुष । तुझा नातु जाणिजे।**–मुक्ते० आदि० २१–८५९; आश्चर्य, नवल. **म्हणती अचोज हा बळिया झाला।**–निळोबा (आवटे ३५). ७ [वृत्तांतु]. ८ Theologia, (पोर्तु.) परमार्थज्ञान. ९ शिकवण, पाठ देणें. १० अजमावला, ताडला; पहा– **मनीं अनुमानी पैं येथ। कपटाचार दिसतसे।**–मुक्ते० आदि० ४–१६१. ११ [आक्षेप] आग्रह, पृच्छा. १२ [अनुदिनी] दररोज. १३ मतलब, तात्पर्य.

पत्रिका लिहिली येणेपरी : म्हणे फ्रे आंतोनी अवधारीं
क्रिस्तु स्वामि प्रसन होऊं तुजेवरि : आपुली कृपा देउनु ११८

मोगाळा[1] माजेआ बंदवा आंतोनी : तुजी चांगि सगुण वार्ता आइकूली कनीं
आतां तुजां ठाईं क्रिस्तु स्वामी : स्वस्त[2] होऊं ११९

ऐसेआं अस्नवचनीं[3] सांतउनि[4] : पत्रिका पाठविली लिहुनि
म्हणे बंदवा फ्रे आंतोनी : परियेसीं आतां १२०

हें येतुकें सुफळ प्रतिदिवसीं : लाभवेया इछितों तुजसि
आणी तुजेआ सदैवपणासि : देंतों अर्गे[5] १२१

शास्त्र कथावेया जनांथें : आणी सकळां रेलिझिओजांथें
थेवोलोझीचें पठण तेआंथें : करावेया तुवां १२२

हें कारण कृत्य तुजेवरीं : मियां नेमस्त केलें साचारीं
तुवां पठण करावेया नंतरीं : मानलें[6] मज १२३

तरि पठण करितां सतंत : तुवा येरां रेलिजिओजांसहित
देवस्मरण चिंतन नसंडितां[7] : करावें कथन १२४

नविसंभतां ध्यान चिंतन : तुवां बरवें करावें पठण
पाळावें हें निर्धार वचन : नित्य तुवां १२५

फुडां आमां ओर्दिचे[8] नितीभितुरीं[9] : निरोपिलें आहे जेणें प्रकारीं
तेआ निति स्वधर्मा सरी : ता चालिलेआ पासोनि १२६

स्वामियें देवें तेआ सांतु आंतोनिसि : किर्ती मानत्वा पाउनि तेयासि
आपुलिये समग्री इग्रजेसि[10] : तेया भगताथें १२७

---

१ प्रेमळा [ गोमंतकी ]. २ [ स्वस्थ ] शांति :– **हें न्हवे संसाराचें स्वस्त । म्हणिपे जें संसार देत** । —स्टिफन्स २-२-४३. ३ [ आशीर्वचनीं ]. ४ [ शांतउनी ]. ५ [ अर्घें ], पहा—**भरोनि पुष्पांजलि अर्घ्यु देऊं** । —ज्ञा. १५–२. ६ मानवलें, पटलें. ७ न सांडितां. ८ पंथ ( order ). ९ नीतीमध्यें, नियमांत. १० चर्चास.

दिव्य दिप्ति लाविलेआचे परी : तेयासि प्रकासविला संसारीं
तेवडी कृपा या भग्तावरि : केली देवें १२८

फुडां तो सदैव सांतु आंतोनि : विविधां पुरांपाटणीं निगोनि
नित्य देसभ्रमण करोनि : कथना करी शास्त्राची १२९

बहुतेकि जाउनि फ्रान्स राज्यदेसीं : आणी इतालिय म्हणिपे विलायेसिं[1]
पठणा करी जनलोकासि : थेवोलोझीची १३०

आपुले जिवित्वदेखी[2] वरउनु[3] : आणी शास्त्रकथने पासौनु
वेळोंवेळां नाना अपुर्वें[4] करुनु : देसनगरीं १३१

बहुतां अभाविकां जनांसि संसारीं[5] : देसपुरां पाटणानगरीं
शास्त्रकथना निरांतरीं : करोनि तेणें १३२

उधंड[6] अभाविक लोक हिए खिती[7] : उपशामा[8] आणोनि दिनप्रती[9]
पाविले परमेस्पराचे सुमुर्ती[10] : भावार्थी[11] करोनि १३३

बहुतेकां जनासि दिनें दिन : सांडोनि तेयांचें अनाचारण
परम शास्त्रासि मेळविन : म्हणोनियां १३४

इतुकी अपव्या[12] तेयाचां मानसीं : नित्य होंती तेआ देवभग्तासि
तेआ पासौनि नगर पुरां देसीं : भ्रमण करुनु १३५

तेआ सदैवा भग्तें निरांतर : हिंडोनि देसपाटणें नगर
शास्त्रकथन करी निरांतर : सकळां जनांथें १३६

तेआ भग्ताचें पठणवचना : आइकतां स्रुतेजनां
अग्नी समाने भेदताये मना : कथना तेयाची १३७

---

१ परदेश. २ जीवित्वाचा आदर्श किंवा कित्ता. ३ वरून, योगेंकरून. ४ चमत्कार. ५ भूतलीं. ६ [ उदंड ] पुष्कळ. ७ [ क्षिती ] पृथ्वीवर. ८ शुद्धीवर, समजावणीस. ९ प्रत्येक दिवशीं. १० स्मृतीस. ११ भाविक. १२ [ अपेक्षा ].

पापिया दोसवंतां जनांसि : उधंडि नितेजना[1] करी तेआंसि
नितेजिते समई कवणाइ येकासि : नकरी भिड १३८

उपशाम[2] करितां सकळां जनां : न बोल्त होता वचना निस्टुरां
बोलुनि बरवि मोगाळां[3] उतरां[4] : उपशामी लोका १३९

जे लोकु करिती शास्त्रस्रवण : तेआं जनां योग्य करी पठण
जेणें गर्हिवरे अंतकरण : तैसी कथना करी १४०

जे कवण शास्त्रस्रवण करिती : ते लोकु अणभवा येंती
अर्थु विवेखु[5] मनीं घेंती : दोस गर्हिवरु धरोनि १४१

अणभवाचि अनंदजळां : ते वरुसविती आपुलां डोळां
शास्त्राची गोडिव सकळां : भेडोनि[6] जिवीं १४२

आपुले अवगुण सांडोनि देती : मागिलिये जिणिसि[7] पल्टु[8] करिती
या परी तेणें उपशामिले केती[9] : पाप दोसि जन १४३

तेआ माजि उधंड अभाविक नर : नावाडुगे[10] निस्टुर खडचर[11]
तदि[12] जे होंते मनकोठुर[13] : शास्त्रद्रुही १४४

ते ते कोठुर लोकु तेआं दिवसीं : उपशामु घेउनि आपुलां मानसीं
देवभग्ता सांतु आंतोनीपासीं : कोंफेसार[14] जाहाले १४५

हेरेझिस[15] शास्त्रद्रुही लोकु बहुतु : सांडोनि आपुलेआ कुढ[16] रितु
मुग्तिवंतु शास्त्रपंथु : आधरिती[17] १४६

१ [ निस्तेजना ] निर्भत्सना, कानउघाडणी; पहा—**कैसा शतधा दुर्वादीं। निस्तेजिलासी ॥** –शा. ११–१०१; **मग लुसिफरार्थे नितेजुनु । बोलता आहाला ।**–स्टिफन्स १–२–९७. २ उपशमन, समजावणी. ३ प्रेमळ. ४ शब्द, बोलणीं. ५ [ विवेकु ]. ६ [ भेदोनि ]. ७ आयुष्यक्रमाला. ८ [ पाल्ट ]. ९ किती. १० ( गोमंतकी शब्द ) नष्ट, खट्याळ. ११ खटनट (?), भांडखोर, ठक. १२ [ तदीं ] त्यावेळीं. १३ [ मनकठोर ] निर्दय. १४ पापाची कबुली देणारे. १५ Herege (पोर्तु.) पाखंडी. १६ खोट्या. १७ [ आदरिती ] स्वीकारिती.

हेरेशी जनांसि निरांतरीं : आपुले प्रतिवादें[1] कुढ[2] करी
म्हणोनि म्हणती हेरेजियां वेरीं : तो चामिटु[3] ऐसा १४७

## चमत्कार पहिला

इतुकेआं हेरेशियां माजि मनुशु[4] येकु : बोनाबिल नांवें शास्त्रद्रुहिकु[5]
माहा अवगुणी होंता अभाविकु : कोठुर मन तेआचें १४८

तो म्हणे सांतु आंतोनी अवधारीं : कोंसाग्रार[6] केललिये होस्ती[7] भितुरि
क्रिस्तु स्वामी न वर्ते संसारीं[8] : ऐसें तो बोलिला १४९

तें वचन सांतु आंतोनी आइकोनि : तेआथें शास्त्रप्रतिवाद[9] करोनि
कोंसाग्रार केललिये होस्ती माजि स्वामि : वर्तताये ऐसें दाविलें १५०

बोनाबिलाचा प्रतिवाद कुंठला : प्रतिउतर द्यावेया विसरला
लोकामाजि थोर लजा पातला : न बोलतां पुणती[10] १५१

मग म्हणे सांतु आंतोनी अवधारीं : क्रिस्तु स्वामि वसे होस्ते भितुरीं
ऐसी प्रचिति अचर्यें[11] प्रकारीं : जरि दाविसि मज १५२

तंव तेणें आपुलेआ घरिंचेआ वेसरासि[12] : कांहीं खाण पिवन नेदितां तेयासि
बांदोनि ठेविलें उपवासि : तिनि दिवसवेरि १५३

तंव देवभगतु म्हणे हेरेजापासीं : कवण अचर्ये दावावें तुजसि
तें सांगितलेआ दाविन सतेसि[13] : ऐसें बोले देवभगतु १५४

---

१ प्रत्युत्तरानें, उलट जबाब देऊन. २ खोटें. ३ [ चामोटा ] (सं. चर्म) कातड्याची वादी किंवा पट्टी, चाबुक. ४ [ मनुष्य ]. ५ धर्मशास्त्राचा निंदक, पाखंडी. ६ Consagrar (पोर्तु.) अभिमंत्रित, प्रतिष्ठित. ७ Hostia ( the word used of Christ present on the altar under the appearances both of bread and wine ) सामान्यतः भाकरीचा नैवेद्य. ८ जगांत. ९ विरुद्ध मतप्रदर्शन, वाग्युद्ध. १० पुन्हां. ११ [ आश्चर्य ]. १२ खेचरालाः—हस्ती वाजी वेसर खरा—मुक्ते. आदि० २५-५१. १३ [ सत्येंसी ].

बोनाबिलु म्हणे भगता अवधारीं : माजें वेसर तिनि दिवसवेरीं
खाण पिवन नेदितां घरीं : ठेविन उपवासि १५५

मग तें तिसरेआ दिवसा उपरीं : ती होस्ति देखिलेआ आपुलां मोहरीं[१]
चारा सांडोनि तेआसि भजैल तरि : भुमी गुडुगिया[२] घालोनि १५६

तरि क्रिस्तु स्वामि आहे होस्ती आंतु : ऐसा मी जिवीं मानिन सत्यार्थु
तंव बोलिला सांतु आंतोनि देवभग्तु : तथास्तु म्हणोनियां १५७

मग लोटलेआ दिवस तिनि : सदैवु देवभग्तु सांतु आंतोनि
आपुलें पवित्र मिस[3] इग्रजांतु[४] सांगोनि : सरलेआ उपरि १५८

आपणें कोंसाग्रार केलेली होस्ति : घेउनु आला आपुलां हस्तीं
माहा द्वारीं पातला त्वरितीं : तो सदैवु भग्तु १५९

तंव हेरेजार्थे म्हणें सांतु आंतोनि : तुजें वेसर येथ आणि रे सोडुनि
तेणें तें आणिलें त्व करुनि : वेसर आपुलें १६०

मग पाहावेया तें वर्तमान : हेरेजिस आणी क्रिस्तांव जन
ते समई पातले थोर लाहान : तें अचर्ये देखावेया १६१

सांतु आंतोनिन ते समयांतरीं : कोसांग्रार केलली होस्ति घेउनि करीं
वेसरासि म्हणे तूं अवधारीं : वचन माजें १६२

म्यां करीं धरिला जेआ स्वामियासि : तेआची आण वाहांतों वेसरा तुजसि
हेआ हेरेजां शास्त्रद्रुहितांसि : द्यावेया साखि[५] १६३

हे कोंसाग्रार केललिये होस्तितु : सत्यचि वर्तताये स्वामि क्रिस्तु
म्हणोनि या साखि द्रुस्टांतु[६] : व्हावेया लोकीं १६४

---

१ समोर, पुढ्यांत. २ गुडघे. ३ Missa (पोर्तु.) रोमन कॅथलिक पंथांतील क्रिस्ताचें मांस व रक्त मानलेल्या भाकरी व द्राक्षासव यांच्या अर्पणविधिपूर्वक उपासना. ४ चर्चांत. ५ [ साक्षी ]. साक्ष, पुरावा. ६ [ दृष्टांत ] दाखला.

सर्व संसाररचना[1] नित्य दिवसीं : हेआ आपुलेआ रचणारा स्वामियासि
मानु देंताये म्हणोनि ऐसी : यावेया प्रचिति    १६५

वेसरा तूं येउनु झडकरीं : तुज्या देवा चरणा सामोरीं
शेरण येउनु भजना करीं : आपुलेआ देवाची    १६६

तंव तेआ हेरेजें आपुलेआ वेसरा : दिधला खाण पिवन चारा
वोडपडि[2] होएल तेआ हारा[3] : म्हणोनियां    १६७

तंव तें वेसर आपुलेआ गोंसावेयाहौनु[4] : बरवें बुधियुग्त आहे देखुनु
आपुलेआ खाणाची आशा नकरुनु : तेया वेळां    १६८

येउनि सांतिस्सिमु[5] सांक्रामेंता[6] मोहरीं : डिंबिया[7] घालोनि वसुंधरी[8]
शेरण आलें तिये अवस्वरीं : आपुलेआ स्वामिया फुडां    १६९

तो रचणारु स्वामि म्हणउनि : आपुला स्वामि ऐसा जिवीं मानोनि
वेसर भजिनलें येउनि : साक्रामेंता फुडां    १७०

तें अपुर्व माहा विपरित : देखोनि तेथिल लोकु समस्त
अतोज होउनु जाहाले विस्मित : सकळइ तेथें    १७१

तंव येरां भावार्थियां जनांसि : जे समइ होंते तेआ दिवसीं
आनंद उछयावो[9] तेआं सकळांसि : जाहाला तेथें    १७२

देखोनि तें अपूर्व वर्तमान : लाजिनलें शास्त्रद्रुहित जन
खालुती करोनि आपुली मान : पाहूं लागले भूमी    १७३

तो बोनाव्रिलु हेरेझेस हेरांहौनि : थोरि लज्या पातला मुख कोमाउनि[10]
आपुला प्रतिवादु कुंठला देखोनि : तिये समई    १७४

---

१ जगाची रचना. २ [ वरपडी ] पात्र, वश; पहा—**तरी पापा वरपडा होसील**–शा० २–२०१; **वडपडा जाहाली यमकोंडासी**–स्टिफन्स, २–२९–७५. ३ पराभवास, हारीस. ४ मालकाहून. ५ Santissimo ( पोर्तु. ) अत्यंत पवित्र. ६ संस्कारलेली वस्तु. ७ ( गोमंतकी ) गुडघे. ८ जामिनीवर. ९ [ उत्सव ]. १० कोमजून, निस्तेज होऊन–**बहुत कोमावली पाहावेना दृष्टी गे उभयांला**।–ऐतिहासिक पोवाडे, ३९९.

मग तेआ वरि आपुलेआ वेसराची : चांगि[1] देखि[2] घेउनि मनजातिची[3]
संधेवो[4] भ्रांति आपुले जिविंची : दवडिली तेणें १७५

उपशामु घेउनु जिवीं शेरिरीं : आपुली कुढी बुधि टांकिली दुरि
पुडिल कथा या उपरि : पाद्रि निरोपिल सुतेआं १७६

## चमत्कार दुसरा

ऐसी विचित्र कथना आइकोनु : उठिला येकु क्रिस्तांवजनु
काये बोले नमस्कारु करुनु : पाद्री पासीं १७७

म्हणे कथन आइकोनि परिकरी[5] : निवालों सर्व गात्रें शेरिरीं
तरि येकि विनंति अवधारीं : गुरु माजी[6] १७८

हेआ अपुर्वाहीनु काहीं : आणियेक अपुर्व कवणिये ठाईं
जर केलें असेल तेहि : तें निरोपिजे आमां १७९

ऐसें विप्रवचन आइकोनि : पाद्रि–गुरु संतोसला मनीं
मग सांगता जाहाला कथुनि : फुडिल कथा १८०

सदैवु सां आंतोनि आणियेके अवस्वरीं : आरिमिन म्हणिपे येके नगरीं
होतां तेआ पाटणापुरीं : सदैवु भगतु १८१

तेआ आरिमिन देसिंचेआ नांवें नगरांतु : हेरेजेस लोकु होंता शास्त्रद्रुहितु
तें देखोनि सांतु आंतोनि देवभगतु : तेआं वेळां १८२

मुग्ति–पवित्रा देवशास्त्रासि : मेळवावेया तेयां हेरेजांसि
शास्त्रपठण तेआं जनांसि : करिता जाहाला १८३

पण ते शास्त्रद्रुही जन : कानीं नाइकति शास्त्रकथन
देखोनि तेआ सांतु आंतोनिन : काये केलें १८४

---

१ चांगली. २ किस्ता. ३ मोनजातीची ( गोमंतकी ), मुके पशुपक्ष्यादि प्राण्यांची. ४ [ संदेहो ] संशय. ५ सुंदर, मधुर. ६ माझी.

आपण सेंधुतिरीं निगाला : जाउनु तेथें उभा राहाला
मग सादु[1] देउनु[2] बोलता जाहाला : शेंधुचेआ मछेकुळां[3] १८५

तुमीं समुद्राचे जळचर : लहान थोर मछे मगर
शास्त्रस्त्रवणासि समग्र : या रे या रे येथें १८६

मियां कथिलेआ हेरेजां प्रती : ते शास्त्रस्त्रवण नकरिति
म्हणोनि आलों तुमांप्रती : करावेया कथन १८७

ऐसें भगतवचन आइकिलेआ वरि : माहा चळवळ सुटले सागरीं
लाहान थोर मछेकुळें समभारीं : येंते जाहाले १८८

येक जळांतुनि उडी घेंती : येरां माछेआं उलंडोनि[4] जांती
आपुले सिंसाट[5] उचलोनि पाहांती : येर येरां सरिसे १८९

येर मधेंचि बुडकळ देउनु : येरीकडां येंती उमटुनु
येक मछे उमटती बुड्डुनु : येरां मोहरीं १९०

येक पाणिया वेंटाळा देंती : बुड्डुनु मकाट[6] दात्रिति :
येक येक पुंसें[7] मारिती : उदकावरि १९१

येर उदकिं ढेवाविती[8] : येक अर्दांग[9] उचलोनि जांती :
येर सरिसेचि जळि पोंवती[10] : येकभारें १९२

आणियेक लाहान मछेकुळ : पाणियासि देंताति चळवळ
धांवती उडती सकळ : येरां मछेआं माजि १९३

ऐसे लाहान थोर मछे : येकत्रोळी येती येका सरिसे
येंताति येक भारें ओपेसे : आपापुलां चालीं १९४

या उपरि मछे लाहान थोर : न करोनि येकमेकांचें वैर
थडिये[11] पातले समग्र : येकमेकां येकत्रटुनु १९५

---

१–२ हांक मारून. ३ मत्स्यजातींस. ४ ओलांडून. ५ डोकें. ६ (?). ७ [पुच्छें] शेंपट्या. ८ [देंवती–गोमंतकी] उतरती. ९ [अर्धांग]. १० [पोंहती]. ११ तडीला, कांठास.

असंख मछेकुळ देखोनि : जिवीं संतोसला सांतु आंतोनि
तंव सांगता जाहाला कथोनि : शास्त्र तेयां १९६

माजेआं बंदवां तुमां वरि : देवें उपेग[1] केले भारि
तेआ उपेगासि संसारीं : उतिर्न[2] होइजे १९७

तेया आपुलेआ दिनवासासि : तुमि मानु देउनु स्वामियासि
अर्गेदाना करा तेयासि : बहुतां परि १९८

ऐसें केलेआ शास्त्रकथन : मग मछेकुळां थोर लाहान
सदैवा भगताचें अस्तवचन : घेतलेआचे परी १९९

येक संवेंचि पाखारुनु[3] : आपुलें सिसाट[4] वरि उचलोनु
सकळइ वरुति मुखें करुनु : निगते जाहाले २००

उडती बुडती ढेवावती : येर येरां उलंडोनि जांती
आणियेक बुडकळोनि निगती : धाई[5] कडां २०१

समग्र मछेकुळ येणेपरी : शास्त्रकथन सरलेआ वरि
परतोनि गेले जळसाघरीं : मछे सकळ २०२

तें अपुर्व माहा विपरित : जे क्रिस्तांवजन होंते तेथ
तें देखोनि माहा विस्मित : जाहाले देखा २०३

म्हणती ही अभिनवाची वस्तु : आधीं देखिली नाहीं संसारांतु[6]
म्हणोनि अतोज पातला बहुतु : लोकु तेथें २०४

तंव द्रुहितां हेरेजां सकळां : कोमावलि तेयांचि मुखकमळां
अदोवदनी[7] भुमंडळा : पाहांते जाहाले २०५

---

१ उपकार या अर्थी हा शब्द येथें वापरला आहे. याचें कारण 'उपकरणें' म्हणजे 'उपयोगी पडणें' अशा अर्थी जुन्या काळीं शब्द वापरला जात होत होता. पहा—**ठायीं उपकरली पांडवा**—ज्ञा० १८-१३५९. २ [ उत्तीर्ण ]. ३ पंख हलवून. ४ डोकें. ५ [ दहाही ]. ६ जगांत. ७ [ अधोवदनीं ].

तेआं द्रुहितांचें पासांड[1] मत : कुंठले तेआंचे प्रतिवाद समस्त
मग होऊं शेरणागत : भग्ता चरणीं २०६

तंव्र जोडुनि आपापुले कर : भुमी सपाट घातले नमस्कार
खेमा[2] करा जी अपराध समग्र : आमां अग्न्यानांयें २०७

तुमांयें पवित्र शास्त्रकथन : मुग्तिवंत आणी पुण्यपावन
तें आइकावेया आमचें मन : उताविळ स्वामिया २०८

ते सदैव देवभग्ता उतमा[3] : प्रार्थना करितेउं[4] गा तुमां
आतां क्रुपाळु होउनु आमां : करा शास्त्रपठण २०९

तें वचन देवभग्तें आइकोनीं : थोरु संतोसु पातला मनीं
शास्त्रकथन आरंभुनि : सांगता जाहाला २१०

तेआचें शास्त्र आइकिलेआ निमितीं : अभाविक्रां हेरेजां माजि केती :
उपशामु घेउनु आपुलां चितीं : अणभवा[5] आले २११

कुढ आचारां रितुं भितुरीं : वेस्टुनु पडले अंधकारीं
तेचि शास्त्र प्रकासा भितुरीं : उजवाडले तदीं २१२

विचित्रि कथना येणेपरी : स्रवण करोनियां मनोहरी
उठिला स्रिवणसभे[6] भितुरीं : क्रिस्ताउं येकु २१३

म्हणे तुजीं अम्रुत उतरां[7] : आइकोनि मदुरां[8] रुचिकरां
पोंवताये माजा आत्मा साघरा : अम्रतलाहारीं २१४

तरि आणियेक अपुर्व हिये संसारीं : तेआ देवभग्तें केलें तरि :
तें मज निरोपिजे हे अवस्वरीं : क्रुपा करुनु २१५

---

१ [ पाषांड ] पाखंड. २ क्षमा. ३ [ उत्तमा ]. ४ [ करित आहों ].
५ [ अनुभवा ]. ६ [ श्रवणसभे ]. ७ वचनें. ८ [ मधुरां ].

## चमत्कार तिसरा

आइकोनि तेआचें प्रुस्टणवचन[1] : संतोसलें पाद्रिचें मन
म्हणे आइकें सावधान : सांगैन तुज 	२१६

आणियेकी समई काहींयेक : हेरेजेस् लोकु शाल्लवंचक[2]
विनउं लागले बहुतेक : तेआ देवभग्तासि 	२१७

म्हणे तुवा आमां समागमीं : भोजनासि यावें जी तुमीं
पवित्र चरण लावा भुमी : मंधिरीं[3] आमंचां 	२१८

बैसोनि तुमंचे पंक्ती[4] : आरोगण[5] करावेया निमितीं
उतकंठा जाहाली बहुति : आमां जिवीं 	२१९

देखोनि तेयांचें मनोरथ : उरंग[6] नकरावेया चित
भग्तु निगता जाहाला तेथ : हेरेजां घरीं 	२२०

हेआ निमितीं तेआं द्रुहितांसि : पात्रविन इग्रजेचेआं[7] स्वधर्मासि
ऐसें चिंतौनु भोजनासि : गेला तेआं घरीं 	२२१

तंव भोजनाचां अवस्वरीं : तेआं द्रुहितीं आपणेआं भितुरीं
घातु चिंतिला गुप्तांतरीं : सदैव भग्तासि 	२२२

म्हणती आरे हा आमंचा वैरी : सधासर्वंधा[8] प्रतिवादु करी
ऐसेआ द्रुस्टासि[9] संसारीं : ठेऊं नये म्हणोनि 	२२३

खाजे[10] परोंपरिचें करुनु : तेआमाजि विस[11] भेळउनु
भोजनासि दिधलें आणुनु : सदैवा भग्तासि 	२२४

तंव तेआंची कपटकरणी : सां. आंतोनिन जाणितली अंतकरणीं
मदुरा[12] सब्दांची बोलणीं : बोले तेयां 	२२५

---

१ [ प्रश्नवचन ]. २ अधार्मिक. ३ [ मंदिरी ]. ४ [ पंक्ती ], पंगतीला. ५ भोजन. ६ विटलेलें, नावुण:–ते आवडी का उरंगु । आतां जालों—उद्धवगाता १४०. ७ चर्चाच्या, कॅथलिक धर्म. ८ [ सदासर्वदा ]. ९ [ दुष्टासि ]. १० [ खाद्य ]. ११ [ विष ]. १२ [ मधुरा ].

म्हणे करोनि जेवणासि आधारु : बरवा तुम्मीं केला पाउणारु
तो तुमंचा कपटप्रकारु : जाणितला मियां २२६

आगा, आपुलेआ मैत्रासि[1] संसारीं : पाउणारु[2] करोनि आपुलां घरीं
जे मारिती कपटप्रकारीं : घालोनि विख २२७

विश्वासलेआंथें घातु करिती : तेआं नमेळे मोख्य[3] मुग्ति
ते येमयाचना[4] पावती : नित्यकाळ २२८

ऐसेआं जनां विस्वासघातकां : अरत्रपरत्र नाहिंचि देखा
जें तुम्मीं मज घातलें विख : तें जाणितलें[5] मियां २२९

हेआ उतरा[6] हेरेजेआ जन : देंती भांजड्याचें[7] वचन
आम्मीं करावेया तुमां हतण[8] : येनुकें केलें नाहीं २३०

मागां स्वामि बोलिला वचन : म्हणे जे मज सत्य मानिती जन
तेहीं विख हळाळ पिवन : केलेइ तरि २३१

तेआ विखबाधापासौनि : मरण नपवती[9] म्हणोनि
ऐसें स्वामि मुखवचनीं : बोलिला देखोनि २३२

तेआ स्वामियाचेआ बोलाची प्रचिति : आमां पाहावेया निमितीं
विस घातलें येणें अर्थीं : सुटावें तुज २३३

तें विस शेवोनियां उधरीं : मृत्यु नपवसी तरि
जी शास्त्रपठणा लोकांतरीं : तूं करतोसि नित्य २३४

तेआ तुजेआ शास्त्राचा सत्यार्थु : द्रुढु होएल आमचेआं मनांतु
मग आधारूं[10] सत्य भावार्थु : आपुलां जिवीं २३५

१ मित्रास. २ [पाहुणेर] निमंत्रण. ३ [मोक्ष]. ४ [येमयातना]. ५ मूळांत 'गाणितलें' (gannitalē) असें असें चुकून पडलें आहे. ६ वचना. ७ वरील १०६ ओवीवरील टीप ९ पहा. ८ हनन. ९ न पावती. १० [आदरूं] स्वीकारूं.

तंव देवभग्तु सांतु आंतोनि : तेआ विखखांजेआसि पाहुनि
सांत क्रुझाची[1] कुरु[2] करुनि : शेविता जाहाला २३६

तें भग्तें शेविलेआ नंतरीं : विख बाधलें नाहि तेआचां शेरिरीं
जैसा होंता तियेची परी : उरला जिवंतु २३७

तंव तें भग्ताचें अपुर्व देखुनु : तेआं अभाविकां माजि केती जनु
येसु क्रिस्तासि सत्य मानुनु : भावार्थी[3] जाहाला २३८

पुर्व आचार रितु समस्ती : वर्जोनियां लोकु केती
परम शास्त्राचिये सुमुर्ती : पातले बहुत २३९

ऐसी ही अपुर्वांची कथा : पाद्रि सांगे क्रिस्तावां समस्तां
आतां यावरिल वेवस्ता[4] : सांगैन तुमां २४०

ती अचर्येकथना आइकुनु : उठिला येकु ब्राहामणु
कांये बोले नमस्कारु करुनु : पाद्रीपासीं २४१

आइकोनि तुमंचें अपुर्व कथन : आनंदसागरीं राहिलें मन
पण येणेंचि न्हवे पुर्न[5] : आरत[6] माजें २४२

## चमत्कार चवथा

आणियेक अपुर्व या उपरि : तेआ भग्तें केलें असेल तरि
क्रुपा करुनु शेवकावरि : निरोपिजे दातारा २४३

तेआ विप्राचेआ बोला : पाद्रि गुरु मानवला
म्हणे भला गा भला : मनभावो[7] तुजा २४४

शास्त्रअपुर्वांचे कथनीं : जरि आरतु जाहालासि मनीं
तरि आतां आइकैं चित देउनि : माजेआ उतरा २४५

१ Cross ( पोर्तु. ) ची, क्रूसाची. २ खूण. ३ धर्मनिष्ठ. ४ [व्यवस्था]. ५ [ पूर्ण ]. ६ इच्छा. ७ मनोभाव.

सांतु आंतोनि देसनगरीं : शास्त्र कथितिये अवसरीं
तेआ भगतावरउनु संसारीं : अपुर्बें करी स्वामि २४६

तेआं माजि काहींयेक अचर्यें थोरां : आतां तुम्हां सांगैन अवधारा
जे प्राणिये आइकती तेआचि उतरां : शास्त्रकथनेचीं २४७

ते लोकु आपुळी जिणि[1] पालटिती : मनीं भगितभाव आचरिती
या परी प्रजा समास्ति : सुफळ पावे २४८

तें अपूर्व वेगळें करुनि : तो सदैवु भगतु सांतु आंतोनि
अनेकें अपूर्वें करोनि प्रतिदिनी : जगीं प्रसिद्ध २४९

तेआ जनां आपापुलिये भासे : कथुनि सांगितलें होए जैसें
ते ते परी जाणवे तैसें : संधेवा[2] विण २५०

म्हणिपे विविध यातिचेआं जनां : येकी भासेन केलेया कथन
तांतांचे[3] भासे[4] तांतांचेआ मना : परसे[5] कथन २५१

## चमत्कार पांचवा

तो देवभगतु आणियेके दिवसीं : निगालेआ शास्त्रकथनेसि
येकि स्त्री भ्रतारा पासीं : आग्न्या मागों निगाली २५२

म्हणे सांतु आंतोनिची शास्त्रसुमुर्ती : आइकावेया मज उतकंठा बहुति
तरि निरोपु दिजो प्राणपती : जावेया तेथें २५३

तंव भ्रतारें तियेचा पाडु[6] नकरोनि : नाहीं पाठविली आग्न्या देउनि
मग ती उपरिये[7] वळगुनि[8] : लागली पाहूं २५४

तो देवभगतु अर्दु[9] कोसुभरीं : शास्त्र सांगे येतुका दुरीं
ती उंचस्थानीं उपरियेवरि : होती वरीं २५५

---

१ जीवितक्रम. २ [ संदेह ]. ३ त्यांच्या त्यांच्या. ४ भाषेत. ५ ऐकूं आई. ६ किंमत, पर्वा. ७ माडीवर. ८ चढून. ९ [ अर्धु ].

भगु आसतां येतुके दुरस्थानीं : तिये स्थियेन उपरियेहोउनि
तेआचें शास्त्रकथन कर्नी : आइकिलें समस्त २५६

## चमत्कार साहावा

आतां आणियेकि अपुर्वता परियेसीं : सदैव देवभगु आणियेके दिवसीं
विसाळे[1] मैधानीं[2] बहुतां जनांसि : काथितां शास्त्र २५७
तंव तिये ठाईं अकस्मात : माहा प्रचंड वायु[3] उठिला तेथ
तेणें विजु[4] वारा झडफळित : धाइ[5] दिसीं २५८
गडगडु सुटोनि आकासीं : मेघपटळें आलीं चौपासीं
घनवरुसावो जाहाला सुस्टिसि : तेयां वेळां २५९
तंव लोकासि आलें माहा जुगांत[6] : येकु येकावरि पडत
तेवां गर्झर उठिले बहुत : मेघा आणी पवनाचे २६०
झोंपावताति तरुंवर : तेयांचेआ शास्त्रा मिसळताति येकत्र
उडती बाउटळियांचे धुळौर : धाइ दिसीं २६१
जे लोक होंते शास्त्रकथनीं : ते भेणें[7] उठिले गजबजोनि
तेंआंसि म्हणे नाभिकारु[8] देउनि : सांतु आंतोनियु भगु २६२
अरे तुमीं लोकु थिर[9] आसा : वायां न करा येकमेकांच्या वोळसा[10]
मनीं द्रडु[11] धरा भरवंसा : स्वामिया देवाचा २६३
तुमां सकळां जनां भितुरीं : करुणाइ येका प्राणियावरि
मेघु नपडे येकु थेंबाभरि : राहा राहा निस्चिंत २६४
देखोनि भगताचें नाभिकारवचन : ठाइचां ठाईं राहिले सकळै जन
आइकूं लागले शास्त्रकथन : सावकास होउनु २६५

---

१ विशाळ. २ मैदानावर. ३१ वायु, वादळ. ४ वीज. ५ दहाही. ६ (युग+अंत) प्रलय, संकट :—**जैसा सिंह हांका । युगांत होय मद्‌मुखा ॥** —ज्ञाने० २–३१५. ७ भीतीनें. ८ निर्भयतेचें आश्वासन : —**जैं राजादेशु दे नाभिकाराचा**—ज्ञा० १०–७. ९ स्थिर, शांत. १० वळसा, फेरा, धामधूम :— **वोळशाचे फेरी सांपडलों ।**—तुका० गाथा ११९०. ११ दृढ.

येतुकेआ चौंकडा गर्झुनु : वरुसूं लागला माहा बनु
तंव तेआ मेघजळें कवणु : भिजला नाहीं २६६

सोभवंता गर्झत गेला : वारेआन[1] उडउनु दुरि नेला
ऐसा अपुर्व व्रुतावंतु वर्तला : तिये स्थानीं २६७

## चमत्कार सातवा

तो देवभग्तु आणियेकां दिनीं : जेजु क्रिस्ताचें पवित्र पायशांव[2] कथोनि
जनांसि सांगता जाहाला अर्थेनि[3] : कथाप्रसंगु २६८

तंव सांव फ्रांसिस्कु बहुतां दुरीं : होंता आणियेकां पाटणांपुरीं
काये अपुर्व वर्तलें ते अवस्वरीं : सांगैन आइका २६९

सुदैव भग्तु तेथहोउनु : अकस्मात अंत्रळ्य[4] येउनु
राहिला आपुले कर विस्तारुनु : क्रुसीं जोडिलेआचे परी २७०

सदैवा सांतु आंतोनी देवभग्तासि : प्रतळ्य[5] येउनि भेटला तेआ दिवसीं
ती साखि[6] दाविली जनलोकासि : पाइशांवकथेची २७१

म्हाणिपे सांतु आंतोनिचीं उतरां[7] : जीं पठण करितो समग्रां
ति सार्ख[8] म्हणोनि तेआ अवस्परा[9] : साखि दाविली ऐसी २७२

ऐसीं अपुर्वें विविधां परी : तेआ देवभग्तें केलिं संसारीं
फुडिल कथा या उपरि : परियेसा स्रुते २७३

## चमत्कार आठवा

तेआ अभिनवां अपुर्वांवरउनु : आणी तेआची सब्दप्राप्ति देखुनु
लोकु येंताति जांताति व्होरसुनु[10] : आइकावेया तेआचें कथन २७४

---

१ वाऱ्यानें. २ Paixão, (पोर्तु.) मनःक्षोभ, यातना (वधस्तंभावरील). ३ स्पष्ट करून. ४ अंतरिक्षांत, आकाशांत. ५ प्रत्यक्ष. ६ साक्षी, प्रचीति. ७ वचनें. ८ साक्ष. ९ [अवस्वरा] प्रसंगीं. १० घडपडत (?).

इग्रजे माजि नसंभेत्र[1] होउनि : जेथ कथन करी सांतु आंतोनि
तेथवेरी निगती खेटोनि : उधंडु[2] लोकु २७५
तेआ सदैवा देवभग्तासि : आपोस्तोल[3] समानु[4] तेयासि
लोकु निगती शास्त्रस्त्रवणासि : उतकंठ होउनु २७६
मध्यान रात्रिचां अवस्वरीं : लोकु उठोनि आपुलां घरोंघरीं
निंगती येकयेकां फुडारीं : गिवसावेया ठाये २७७
तेआंचें शास्त्रकथन होयेवेरि : हार दुकानां लोकु भुसोरीं[5]
आपापुलीं दुकानें तंव वेरि : ढांपिती[6] देखा २७८
करोनि सरलेआ शास्त्रकथन : भग्ताचेआ करा आबिताचें[7] चुंबन
घेआवेया येंती उधंड जन : भग्तापासीं २७९
तेआ लोका भारि घुसणी हुउनु[8] : सदैवु भग्तु उपद्रैल[9] देखुनु
लोकामाजि बळिवंत लोकु येउनु : सांवरोनि धरिती तेया २८०
सांतु आंतोनिन येक दिवसीं : पादुआ नांवें तेआ नगरासि
शास्त्रपठण करितां लोकासि : पायशांवकथा २८१
तिये पायशांवकथेचें व्याक्रण[10] : जनलोकीं करोनि स्त्रवण
येकेकां जनांचें अंतकरण : दरउनियां[11] २८२
आपुले आंगिचिं वस्त्रे उतरुनु : स्वामियाचे भग्तीपासौनु
घेंती पुस्टीवरि[12] मारुनु : फार[13] बहुत २८३
पायशांवदुख आइकिलेआ निमितीं : विदिनगरीं मारोनि घेंती
ठाईं रग्त सांडविती : देवभग्तीपासौनु २८४

१ ( न सामावे ? ). २ उदंड, पुष्कळ. ३ (Apostolo–पोर्तु.) क्रिस्ताचा प्रेषित. ४ मूळांत 'सामानु' (Samanu) असें आहे. ५ भुसारी धान्याचे व्यापारी. ६ झांकिती, बंद करतात. ७ पोशाख. ८ होऊन. ९ उद्रपव पावेल. १० व्याकरण, स्पष्टीकरण. ११ द्रवून. १२ पाठीवर. पहा–**विनता पुष्टीं वाहोनि सुखें** ।–मुक्ते० आदि. ६–१२२. १३ प्रहार.

तेआ लोकांचे भग्ती देखीबरउनु : बहुतेकां नगरिंचे जनु
कायसांत्र दिवसीं घेंताति मारुनु : अपुलअं पुस्टीवरि[1] २८५
असों हेआ भग्ताचेआं वचनां निमिर्तीं[2] : कृपालु स्वामि देवो मुग्तिपति
करी अपुर्वी करणिया बहुती : दिनेंदिनु २८६
भोउ[3] वेळां येकेक जनांथें : निद्रेस्त असतां मनुशांथें
द्रुस्टी पडोनि बोले तेयाथें : आपुलां वचनीं २८७
म्हणे आरे तूं उठोनि आतांचि : निगैं पैल तेआ पाद्रीपासीं
जें हें तुवां पातक केलेंसि : चुकोनि स्वामिया वरि २८८
हें पाप पाद्रीप्रती सांगिजे : बरवेआ परी कोंफेसार[4] होईजे[5]
तो निरोपिल तें प्रास्चित किजे : अपुलेआं दोसांचें २८९
पाहेपां येका स्वामिया वांचुनु : आणी तो मनुशु वेगळा करुनु
तो तेयांचा पापदोसु अघदिनु : ठाउवा न्हवता कवणा २९०
पाहेपां स्वार्थी मनुश्यु येकु : होंता अती द्रव्यसंपनिकु
पुरउनि तेआचा आउश्यसंखेतु[6] : निवर्तला संसारीं २९१
तेआ धनलोभियाचेआ म्रुत्यासि : उपावो परिहारु करावेया तेआसि
सांतु आंतोनि तेआचेआ म्रुत्यदिवसीं : कथन करोनि २९२
म्हणे आइका तुमीं क्रिस्तांव जन : क्रिस्ता तारका स्वामियाचें वचन
म्हणे तुमचें द्रव्यधन : ठेविलें तेथें २९३
तुमचेआ काळिजाचो[7] गोंडु[8] असे : म्हणोनि स्वामियें बोलिलें ऐसें
हेआ स्वार्थिया ठाईं वर्तले तैसें : देखाल तुमीं २९४
तंव ही प्रचिति पाहावेया खरि : लोकु निगोनि स्वार्थियाचां घरीं
तेआचे द्रव्यपेटिये भितुरि : पाहेपां तुमीं २९५

१ पाठीवर. अशा प्रकारचे आत्मक्लेश झेवियरनें केल्याचें त्याच्या चरित्रांत नमूद आहे. २ निमित्तें, कारणें. ३ बहु. ४–५ Confessar, (पोर्तु.) पापोच्चार कर. ६ आयुष्यसंकेत. ७ गोमंतकी बोलीचा ओकारांत षष्ठीचा प्रत्यय. ८ गोंडा.

मग तेआ घरिं निगुनु : तेआची द्रव्यपेटी उगडुनु
पाहांती तंव देखिला नयेनीं : काळिजाचा गोंडु २९६

ऐसी कथना माहा परिकरि[1] : सुते आइकोनि ते अवस्वरीं
येकु विप्रु उठिला तेआ भितुरि : जोडुनि कर २९७

पाद्रिसि करोनि नमस्कारु : म्हणे परियेसीं गा पाद्रि गुरु
फुडिल कथेचा संप्रधारु[2] : निरोपिजो दातारा २९८

ऐसीं हीं अभिनवें अपुर्वां उतमां : सुस्टी माजि माहा अनुपमां
तीं कृपा करोनि निरोपिलिंसि आमां : सनाथु जाहालों स्वामी २९९

आतां यावरि अचर्य काहीं येक : आमां निरोपिजे प्रेमादिक
जिवि आरत जाहालें बहुतेक : आइकावेया मज ३००

तंव पाद्रि म्हणे अवधारीं : तेणें भगतें केली नवलपरी
ती तेआची अपुर्वता सविस्तारि : सांगैन आइक ३०१

## चमत्कार नववा

हेआ सदैव भगताची सासाइ[3] : न्हवे येकेचि कथनेठाईं
पण तो आणियेके प्रस्ताईं[4] : सासायेवंतु थोरु ३०२

म्हणिपे कोंफेसारा ठाईं : अदिकि असे तेयाची सासाइ
काये वर्तलें कवणे येके समईं : तें आइका तुम्हीं ३०३

हेआ सदैवा देवभगता पासीं : येकु मनुशु माहा पापदोसी
कोंफेसार होवावेया येके दिवसीं : आलेआ वरि ३०४

तो दोसी कोंफेसार होंते वेळां : मनीं धरोनि दोसांचा कांटाळा
आपुले पापदोस भगताजवळां : सांगों म्हणे तरि ३०५

पापदुखाचिआ हिंपुटिया[5] उभरीं[6] : येउनि झोंबती कंठुवेरि
तेणें शेब्दु न ये मुखांतरीं : बोलावेया ३०६

---

१ मनोहर. २ विचार. ३ साक्षात्कार. ४ प्रसंगीं. ५ क्लेश, कष्ट. ६ उबरी.

उचारु करावेया आपुलेआं दोसांचा : कुंठली तेयाची बोलणी वाचा
येतुका अभिप्रावो देखोनि तेयाचा : संदेवा भग्तें ३०७
तंव तेयासि म्हणे सांतु आंतोनि : जरि दोसउचारु नकरवे वचनीं
तरि तुजि पातकें आणीं कागळीं लिहुनि : माजे फुडां ३०८
तें भग्ताचें वचन आइकुनु : तेणें आपुले दोस कागळीं[1] लिहुनु
कागळ दिधलें डिंबियां[2] घालुनु : देवभग्तापासीं ३०९
जीं कागळीं लिहिलीं होतीं पातकें : तीं पाहूं गेलेया सकळैकें
भांजलीं देखिलीं येंकान येकें : तेआ मनुशें ३१०
ऐसें हें अपुर्व तिये समईं : वर्तलें कोंफिसांव[3] ठाईं
ऐसी सांतु आंतोनिची सासाइ : प्रघटली जगीं ३११

## चमत्कार दाहावा

आणियेके दिवसि येकु कुमरू : करावेया आपुलेआं दोसांचा पुरिहोरू[4]
करूं गेला पापउचारू : भग्तापासीं ३१२
आपुले दोस उचारिते वेळां : म्हणे देवभग्ता जंवळां
माजिये मातेसि मियां येकि वेळां : मारिली चरणघातीं ३१३
तंव देवभग्नु नितेजी तेयासि : जे चरणीं मारिली मातेसि
तो चरणु छेदावेयासि : फावे[5] जाणा ३१४
कोंफेसार सारोनि झडकरी : तो तारुणा निगोनि आपुलां घरीं
चरणु कापुनु घातला बाहिरि : दोसदुख धरोनि ३१५
तें वर्तमान देवभग्तें आइकोनि : तेआ तारुणेआसि आणा म्हणे मागुतेनि
तेआचा चरणु आदिकरुनि : माये जंवळां ३१६
तो थोंटा[6] कुमर आणिला देखुनु : भग्तें देवप्रार्थना करुनु
कापिला तो चरणु लाउनु : सांदिला[7] पुणति ३१७

१ कागदावर. स्टिफन्स हा शब्द वापरतो. २ गुडघे. ३ पापोच्चार, कबुली. ४ [परिहार]. ५ प्राप्त किंवा योग्य आहे:—**जो इंद्रियांतें चोरुनु जेवी। तेयासीच फावे**।—ज्ञाने० ६-२३. ६ लंगडा. ७ [सांधिला] दुरुस्त किंवा नीट केला.

## चमत्कार अकरावा

फुडां हेआ देवभग्तावरि : पापी सैतानु द्रुस्टु अरी
मछरु द्रुस्टत्व निरांतरीं : लागला करूं ३१८
सैतानु म्हणे आपुलां मनीं : याचेआं अपुर्व करणियां पासौनु
थोर राजिक[1] होये दिनें दिनिं : माजेआ स्वामित्वावरि ३१९
ऐसा हा द्रुस्टु दुराचारी : माहा खळु आला आमांवरि
ऐसेआसि ठेऊं नये संसारीं : म्हणे तो सैतानु ३२०
मग येके रात्रिचां अवस्वरीं : येउनि ता सैतानु दुराचारी
भग्ताचा कंठु आपुलां दोई करीं : त्राटिला[2] तेणें ३२१
वर्मी धरी कंठनाळा : चेपिली तेयाची अम्रुतकळा
तवं सांडों पाहे तेचि वेळां : आपुला प्राणु ३२२
सदैवा भग्तें तिये अवस्वरीं : हुदई घ्याली सांत मरी
म्हणे पावैं गे पावैं झडकरीं : काकुळतिचे माते ३२३
ऐसें स्वामिणिचें नांव आइकुनु : भेणें कळवळला पापी सैतानु
पळला देवभग्तासि सोडुनु : तियेचि वेळां ३२४

## चमत्कार बारावा

आणियेके दिवसीं सांतु आंतोनि : शास्त्र सांगतां कथना करुनि
द्रुस्टा सैतानें पुलपितु[3] लोटुनि : घातलेआ वरि ३२५
शास्त्रस्त्रिवणिकां[4] जनांसि : बोवाळु[5] उठिला सकळैकांसि
होरसुनु[6] पडले येकमेकांसि : आदळु होउनि ३२६
देखोनि तेआ लोकाचा गझरु : देवभग्तें दिधला नाभिकारु
वायां न करा गा वोळसा थोरु : निभ्रांत[7] आसा तुमीं ३२७

१ राजक्रांति, बंड. २ टराटिला, जोरानें दाबला. ३ Pulpito (पोर्तु.) व्यासपीठ, उपदेशासन. ४ धर्मशास्त्र श्रवण करणाऱ्या. ५ गडबड, धांदल. ६ वर ओवी २७४, टीप १० पहा. ७ निःशंक, निर्भय.

भगताचेआ शेब्दावरउनि सकळांसि : निभ्रांत जाहालें तेया लोकासि
काहीं वोखटें[1] न्हवतां कवणा येकासि : स्वस्त उरले समेस्त ३२८

## चमत्कार तेरावा

सदेवु देवभग्तु अनेके दिवसीं : शास्त्रकथन करितां जनांसि
दुस्टु सैतानु येऊनि तेआ दिवसीं : काये केलें परियेसा ३२९
येका वाटसुराचें रुप धरुनु : कथनेठाईं आला सैतानु
येके स्त्रियेपासीं म्हणे येउनु : तूं नेणसि काये ३३०
अगे येथें राहुनु काये करिसी : घरिंचें वर्तमान नेंणसि
म्यां आईकलें देखिलें तें तुजसि : सांगावेया आलों ३३१
तुजा पुत्रु घरीं निवर्तला : तसा रुधनवोळसा आइकिला
म्हणउनि तुज सांगतों वइला[2] : तुज घरिंचें वर्तमान ३३२
तें तेआचें वचन आइकिलेआवरि : दुखें झळंबली[3] ती नारि
रुधन करोनि दुखभारीं : व्याकुळ जाहाली ३३३
म्हणे कटकटा ऐसें जरि जाणतीं : तरि पुत्रासि सांडोनि येथें नयेतीं
तेआसि सांभाळुनु तेथेंचि राहांती : म्हणोनि घाली स्वास ३३४
नाना दुखविलाप करुनु : आपुलां घरीं जाऊं पाहे परतुनु
तें तियेचें दुख भग्तें देखुनु : तेयां वेळां ३३५
आपण आसतां शास्त्रकथनीं : ते स्त्रियेसि म्हणे तेथहोउनि
अगे तूं वायां रुधन करोनि : निगों पाहांसि घरीं ३३६
हेआ वाटसुराची ऐसी वार्ता : तुवां साच न मनावी सर्वथा
हा कपटी सैतानु येउनु वेर्था : ठकितो[4] तुज ३३७

१ वाईट, इजा. २ [ वहिला ], खरोखर. ३ झपाटली, व्यापली :— सर्वेचि प्राणी झळंबला ॥ मायाजाळें ।—दासबोध ३–४–४९; पिता पाहे तों मोह झळंबला ।—ध्रुवाख्यान ५. ४ ठकवितो, फसवितो :—तेथें मायेनें ठकिलें भजकारणें ।—एक० भाग०–१९०.

सत्यशास्त्राचा पुण्यफळु : तुज होवावेया निर्फळु
हा दुस्टु सैतानु चांडाळु : भ्रमवितो तुज ३३८
निवर्तला नाहीं तुजा सुतु : सुखें घरीं असे गे जिवंतु
हेआ पासौनि न धरीं मनांतु : संदेवो काहीं ३३९
ऐसें बोलिला सांतु आंतोनि : तंव सैतानु धस्कला[1] मनीं
पळाला अद्रस्टु[2] होउनि : गिरिकंदरीं ३४०
ऐसा देवभग्तु दिनेंदिन : लोकांसि करितां शास्त्रकथन
दुस्टु सैतानु नित्य दिन : दुस्टत्व करी ३४१
हे दोगइ जण निरांतरीं : युघ्य[3] करिती येकमेकावरि
जुझ भांडण येणे परी : नखंडे तेआंचें ३४२
सांतु आंतोनिची पठणा समस्ति : जे प्राणिये स्रवण करिती
ता तेआ लोकासि दिनप्रती : उपद्रवी सैतानु ३४३
तंव तो देवभग्तु दिनेंदिन : करोनि परमेस्पराचें चिंतन
तेचि उभराभरी दिनमान : पावित होंता ३४४
आणी स्वामि देउ कृपावंतु : स्वर्गिंचे अमृतें सतंतु
हेआ देवभग्ताचा मनोरथु : पुरवित होंता ३४५

## चमत्कार चवदावा

सदैवु सांतु आंतोनि येके अवस्परीं : फ्रान्स देसीं आसतां येका आस्रम्यांतरीं
येक वर्तमान वर्तलें तेआ मंधिरीं : माहा थोर ३४६
क्रिस्तु स्वामि देवनंदनु : तेथें लाहान बाळकाचें रुप धरुनु
दिव्य स्वरूपें भेटुनु : पडला दुस्टी ३४७
कोटि सूर्येप्रकासकळा : फांकली तेआ सुलख्यणा बाळा
सर्व संपूर्ण दिव्यपुतळा : देखता जाहाला ३४८

१ [ दचकला ]. २ [ अदृश्य ]. ३ [ युद्ध ].

तंव भग्तें जोडुनि दोनइ हस्त : केले सास्टांगें प्रणिपात
मग काये बोलिला होएल तेथ : परियेसा सुते ३४९
करसंपुस्ट जोडोनि म्हणे : स्वामिया तुजेआ पवित्र दरुसेणें
धन्य सुफळ जाहालें जिणें : आजि माजें ३५०
स्वामिया तूं करुणेचा सागरु : मुग्तिराजा परमेस्वरु
तूं विस्वदिपकु दिनकरु : स्वर्गासंसाराचा ३५१
मीं अग्न्यानु बाळु तुजा किंकरु : तुवां केलासि भेटचा कैंवारु[1]
हा येवढा तुज उपेगु थोरु : केवी होइजे उतिर्न ३५२
सुक्रुताचेआ[2] लख्य कोटी : जरि आचरलेआ हे सुस्टी
तरिइ नलभे तुजी भेटी : दुर्लबि[3] दातारा ३५३
तरि भेट द्यावेया काजा : तुवां अनुग्रहो केलासि माजा
मीं शेरणागतु देखोनि तुजा : क्रुपा केली स्वामिया ३५४
तूं त्रिलोकिचा चक्रवती[4] : मीं डिंगरु[5] गा अल्पमती
सुफळि भेट देउनि काकुळति : केलिसि स्वामिया ३५५
मुग्तिभरित चरणकमळ : ग्यां देखावेया आपुलां डोळां
येवडें हें सदैव क्रुपाळ : दिवलेंसि मज ३५६
अमिते स्वरूपाची दिव्य रासि : तुवां दाविली मज शेवकासि
स्नेह्यातु[6] केला गा किंकरासी : क्रुपाळा स्वामिया ३५७
आतां त्राहीं त्राहीं गा जेजु राया : दिव्य बाळका किस्ता स्वामिया
सहस्र संख्या तुजेआं पायां : प्रणिपात माजा ३५८
ऐसी विविधां परि तुस्ति करुनि : बहुते अर्गेदानां देऊनि
बोलिला होएल सांतु आंतोनि : तेयां वेळां ३५९

१ दयेमुळें केलेलें साहाय्य किंवा पक्षपात. २ [सुक्रुताच्या] पुण्याच्या. ३ [दुर्लभ]. ४ [चक्रवर्ती] सार्वभौम राजा. स्टिफन्सदेखील असेंच रूप वापरतो. ५ दास, भक्त, बालक :—**जो जाला हरीचा डिंगरु। त्यासी संसारु असेना।** —ए० भा० २३-९२८. ६ Sneheatu (स्नेहार्तें ?).

येतुकेआ स्रस्टु सिरोमणी येउनु : तेआचें गुफद्वार[1] उगडुनु
पाहूं लागला निरोखुनु : भग्ता ठाईं ३६०

तरि तेणें देखिला येकु बाळकु : दिव्य स्वरुपु सुलख्यणिकु
तेजपुंजु माहा रत्नदिपकु : न लेखवे स्वरुप ३६१

लावण्यजोति तेजपुतळा : जैसी सूर्यबिंबकळा
ऐसा शेरिरधातु सकळा : देखिलेआ तेणें ३६२

खिणु[2] येकु तेयासि पाहे तरी : देखे भग्ताचेआ पुस्तकावरि
खिणा येका गोफां[3] भितुरि : देखता जाहाला ३६३

देखोनि झांकुळली[4] तेआची द्रुस्टि : माहा आनंदु पावला स्रुस्टी
विस्मित होउनु तेआचा पोटीं : भ्रमित जाहाला ३६४

म्हणे हें नवल वित्पन[5] : काए मीं देखें जाग्रुत स्वप्न ?
म्हणोनि तेआ स्रस्टाचें मन : अतोज होये ३६५

म्हणे लख्य कोटि बाळकां : सरी नपवती ह्याचेआ स्वरुपा
पाहेपां केवडी देवक्रुपा : जाहाली हेआ भग्तासि ३६६

काये बाळरुपीं क्रिस्तु स्वामि आला : या सदैवासि प्रसन जाहाला
ऐसा तेणें मनीं भासिला : देखोनि डोळां ३६७

तंव तो स्रस्टु बुधवंतु म्हणे : धन्य धन्य जाहालें माजें जिणें
हेआ इदुलेआ[6] बाळकाचेनि दरुशेणें : निवालों सर्व शेरिरीं ३६८

तंव ऐसा तेआ वर्तमानीं : देवभग्तें आपुले गुफे आंतुनि
तेआ घरधनियासि नयेनीं : देखिला तेवां ३६९

तंव सांतु आंतोनि म्हणे मानसीं : जेजु स्वामियें मज शेवकासि
जो केवारु केला हिये दिवसीं : भेटोनि आमां ३७०

१ गुंफा=कोठडी, पर्णकुटी, गुहा. २ क्षण. ३ गुंफा (?). ४ दिपली.
५ [ वित्पन्न ] विशेष. ६ इवल्याशा.

तो तेणें देखिला म्हणोनि : देवभग्तें जाणितलें मनीं
मग म्हणे तेआसि बोलाउनि : आपुलां जवळां ३७१

अगा येक मीं मागतों तुजे पासीं : तें तुवां द्यावें मजसि
जें हें अपुर्व तुवां देखिलेंसि : आपुलां डोळां ३७२

तें नवल मीं जिवंतु आहे वेरि : कवणा येकासि नजाणविजे संसारीं
देखिलें तें प्रघट न करीं : जनां माजि ३७३

तें भग्तवचन वाहुनि सिरीं : सांतु आंतोनि जिवंतु आहेवेरि
तें वर्तमान तेणें संसारीं : नाहीं जाणविलें कवणा ३७४

फुडां येकु नोविसु[1] जनु : सैतानां नाढिवेवरउनु[2]
आपुला आंगिचा आबितु सांडुनु : जाऊं पाहे बाहिरी ३७५

तेआ निमितीं हा देवभग्तु : आपुला मनीं जाहला दुस्चितु[3]
आतां काये उपावो करुं म्हणतु : नोविसास्तव ३७६

तंव तेआ नोविसा निमितीं : विनउनु देवा स्वर्गपती
भाकोनि करुणा कृपा भउति[4] : परमेस्पराची ३७७

मग तेआ नोविसासि बोलाउनु तेआचे वचन उगहुनु
सुस्कारु दिधला घेई म्हणउनि स्पिरितु सांतु ३७८

तें वचन बोलतिये अवस्वरीं तेआचा निछेव[5] पडला बाहिरि
तंव थिरु राहिला तियेचि मुस्तेरीं न सांडितां आबितु ३७९

जंव वेरि होता जिवंतु तंव वेरि तो राहिला स्वस्तु[6]
काहिं वाइटिव[7] वासना मनांतु पुणति आलिचि नाहीं ३८०

---

१ Noviço. (पोर्तु.) नूतनाभ्यासी. २ फसवणुकीमुळें. ३ खिन्न.
४ बहुती. ५ निश्चय. ६ शांत. ७ वाइटाची.

## चमत्कार पंधरावा

फुडां कत्रणे येके दिवसांतरीं : फ्रान्स देसीं येका नगरीं
सांतु आंतोनि येका मुस्तैरा भितुरि : असते वेळां ३८१
येका रेलिजिओजा जनांचां मनीं : घेगुण[1] वासना संचरोनि
तेआचेआ भग्तिसत्वासि हाणि : होऊं पाहे ३८२
आपुलें सत्व नटाळावेया कारणें : केति उपाये उपर्जिले तेणें
पण कल्पनेचें टाळणें : न संवखे[2] जाहालें ३८३
तंव तो रेलिजिओजु नित्यदिन : करित होंता देवस्मरण
देहप्रास्चित[3] आणी दंडण : केलें बहुत ३८४
भोउ[4] वेळां कोंफेसार जाहाला : कोमुजांव[5] साक्रामेंतु[6] शेविला
तरिइ तेआचा नसंडे[7] जाहाला : वासनागुणु ३८५
न्हवे तिये वासनेची खंडणा : देखोनि तो रेलिजिओजु आपण
दुखभरित करोनि अंतकरण : गर्हिवरु वाहे ३८६
शेरण येउनु सांतु आंतोनिसि : कोंफेसार जाहाला तेया पासीं
आपुलीं पातकां त्याचि दिवसीं : सांगितलीं तेणें ३८७
तंव येरें तेआ रेलिजिवोजासि : नेउनियां येकांत आस्रमेआसि
आपुले आंगिचि पइरणी तेआसि : पइरविली देवभग्तें ३८८
तंव तेआची पापवासना समस्ति : खिणा[8] माजि जाहाली नास्ती[9]
जिवंतु आहेवेरि पुणति : आलिचि नाहीं ३८९

---

१ ( धिक् + गुण ? ) हलकी, वाईट. २ [ न संवके ] संवकणें = रुळणें, संवय पडणें. ३ [ देहप्रायश्चित ], देहदंड. ४ [ बहु ]. ५–६ Communhão sacramento ( पोर्तु. ), कॅथलिक पंथांतील एक धार्मिक संस्कार. " That the Body, Blood, Soul and Divinity of Christ are given in the Communion, and that Christ is received whole and entire under either kind—*i. e.* under the form of bread alone or wine alone is an article of Catholic faith— ". ७ [ न सांडे ], नष्ट होईना. ८ [ क्षणा ]. ९ नाहिंसी.

हेआवरि हेआं दों वस्तूं ठाईं : तेआ भगताचि थोरि सासाइ[1]
द्रुस्टि पडे बहुतां प्रस्ताईं[2] : साद्रस्ट[3] होउनु ३९०

ता सदैवु भगतु सांतु आंतोनि : ग्न्यानि देव अनुग्रे वरउनि
फुडार भविस्य आपुलां मनीं : पारखित होंता ३९१

पाहे पां कवणी तेआ दोनि वस्तु : आणी तेआं वस्तुंचा कवणु अर्थु
हेआ येतुकेआचा द्रुस्टांतु : आइका आतां ३९२

## चमत्कार सोळावा

येकि सजनि[4] पतिव्रता नारि : पुत्र नाहीं देखोनि आपुलां घरीं
म्हणउनि नित्यकाळ चिंता करी : आपुलां जिवीं ३९३

सदैवा भगता सांतु आंतोनिसि : शेरण निगाली येके दिवसीं
थोरि कणिवें[5] क्रुपा भगतापासीं : भाकोनि म्हणे ३९४

ये सदैवा भगता माजे निमितीं : प्रार्थना करोनि स्वर्गपती
निपुत्र खंडोनि पुत्रवंति : ऐसें करि कां मज ३९५

तंव देवभगतु म्हणे तिये नारी : तूं पुत्रत्व पावसी गे संसारीं
तो पुत्रु देव इग्रजे[6] भितुरि : स्रस्टु होएल ३९६

सांव[7] फान्सिस्काचें ओर्दिचा[8] : रेलिझिओजु देवभग्तिचा
आणी देवशास्त्रा नितिचा : मार्तिरि[9] होएल ३९७

आणी तेआ वरि बहुतेकां जनां : तो होएल पितेया सामान[10]
मार्तिरां भग्तांचें उपशाम : करिल तोचि ३९८

जें वचन देवभगतें बोलिलें : तिये नारिसि तेणें सांगितलें
मग तेंचि वचन साच जाहालें : फळस्त[11] होउनि ३९९

---

१ (गोमंतकी) साक्षात्कार. २ प्रसंगीं. ३ दृश्यमान, साकार. ४ [सजनी?] सुस्व-भावी. ५ [कणव] दया. पहा :—जे हिताहित देखति । हाणि कणवा घेपति ॥ —ज्ञाने० १३,१०३७. ६ Igreja (पोर्तु.) चर्च, क्रिस्तीधर्म. ७ (पोर्तु.) संत. ८ (पोर्तु.) पंथाचा. ९ (पोर्तु.) हुतात्मा. १० [समान]. ११ [फलस्थ], सफल.

फुडां फ्रांस देसीं राज्यांतरीं : तेआं देसिंचेआ राज्यपुरां नगरीं
येकु स्त्रीकरणी[1] होंता तेआं भितुरीं : वर्ते अवलक्ष्यणु[2] ४००

सांतु आंतोनि तेआ स्त्रीकरणियासि : सम द्रुस्टी देखे ते ते दिवसीं
डिंबिया[3] घालोनि नमस्कारी तेयासि : वेळों वेळां ४०१

मग येके दिवसीं आधिल्या होउनु : आपणेआसि बहुतें मनत्वें करुनु
तेणें नमस्कारु केला देखुनु : लिणत्व प्रकारीं ४०२

तंव कोपा चढला तो स्त्रीकरणी : माहा खंकाळ[4] जहाला अंतकरणीं
आपणेआसि हा चकाटपणीं[5] : चाळवितो[6] म्हणोनि ४०३

म्हणे पाहे पां हेआ भग्ताचे गुण : वेळों वेळां मज करी चाळवण[7]
म्हणोनि क्रोधांत अंतकरण : जाहालें तेयाचें ४०४

क्रोधें भोंविया पडलेआति गांठी : तरासोनि[8] पाहे क्रुर द्रुस्टी
म्हणे देवभ्रांति जरि पोटीं : न्हवती मज ४०५

तरि येणेंचि हेआ खर्गें[9] निट : दुभेद करितों रे तुजें पोट
पुणति न करी ऐसें चकाट[10] : माजे ठाईं ४०६

तंव भग्तान सुढाळ[11] वदनीं : तेआ निर्गुणा स्त्रीकरणियासि पाहुनि
काये बोले संदेव सांतु आंतोनि : तेया पासीं ४०७

आगा तुज मियां आधिलेआ होउनु : अदिकपणें मानिला म्हणउनु
न कोपैं गा हेआ पासउनु : वायांविण ४०८

स्वामिया परमेस्पेरं आमांसि : येक गुप्त स्तुत केलें मजसि
हेआं फुडां तूं मार्तिर होंसी : म्हणोनियां ४०९

तरि हेआ निमितीं भउतां[12] परि : मार्तिर होवावेया प्राणें शेरिरीं
केती प्रार्थना केली तरि : परमेस्पराथें ४१०

१ [ श्रीकरणी. ] हिशेबलेखक, अकौंटंट. २ [ अवलक्षणु ] दुर्वृत्त. ३ गुडघे. ४ उग्र, रागीट. ५ लबाडपणानें. ६ चेष्टा करतो. ७ चेष्टा, चिडवणूक. ८ [त्रासोनि]. ९ [ खड्गें ], तरवारीनें. १० चेष्टा. ११ सुंदर, सुरेख. १२ [ बहुतां ].

तेवडा या सदैवाचा मानु : कथिंचि मज न लभे म्हणउनु
थैसं सदैवां मार्तिरांसि देखुनु : मानितों बहुतु ४११
तरि तो निस्टुरु निर्गुणु स्त्रीकरणी : विवेखु[1] विचारु नधरितां अंतकरणीं
देवभग्ताचेआ उतरासि[2] हांसोनि : चकाटें करी ४१२
मग तो थोडेआं काळां दिवसीं : शास्त्र सांगावेया मिलंछय जनांसि
तेथिल बिस्पु जेरुजालेआ नगरासि : निगालेआ वरि ४१३
तो अवगुणी स्त्रीकरणी तेआ बिस्पासरी[3] : तदि गेलेआ जेरुजालेआ नगरीं
काये वर्तलें तेआ समयांतरीं : परियेसा सुते ४१४
तेआ व्रधा[4] बिस्पें येके दिवसीं : आपुले मथरपणें[5] जनांसि
शास्त्रपठणा केली तेयांसि : देखोनियां ४१५
तो क्रुरु स्त्रीकरणी तेआं दिनीं : देवस्नेहें मनीं झळंबोनि
माहा रइवासवंतु[6] होउनि : करूं लागला कथन ४१६
तारका जेजु स्वामियाची सुमुर्ति : माहा पवित्रि आणी मुग्तिवंति
आणियेकि सुमुर्ति[7] तेया परुती : नाहीं म्हणे संसारीं ४१७
तेचि शास्त्र सत्यवंत आणी निर्मळ : पवित्र मुग्तिपावन केवळ
ऐसें शास्त्र कथुनि सकळ : सांगता जाहाला ४१८
आणी मासामेदिचें[8] कुढ[9] मत : तें लटिकेंचि म्हणउनु समस्त
स्त्रीकरणियें दाविलेआ निमितीं तेथ : कुढचि करोनि ४१९
तें वचन मिलंछीं आइकोनि : आपुलें शास्त्र निंदिलें म्हणोनि
क्रोधें बंधी घातला धरुनि : तेआ स्त्रीकरणियाथें ४२०
तिनि दिवस तिये बंधी भितुरि : अपदा देउनु नाना परि
मग तिनि दिवस सरलेआ वरि : काये केलें द्रुहितीं[10] ४२१

१ [ विवेक ]. २ शब्दास. ३ बिशपाजवळ. ४ [वृद्धा]. ५ Matharpanne ( मंथरपणें ), रेंगाळत, सुस्तपणें. पहा–स्टिफन्स, २–५४–४४. ६ एकनिष्ठ, भक्तिपूर्ण. पहा : **ते रइवास करोनि म्हणती** । –स्टिफन्स-पु. २, अ. ५५, ४४. ७ [ स्मृति ], धर्मशास्त्र. ८ महमदाचें. ९ खोटें. १० द्रोह्यांनीं, वैऱ्यांनीं.

कोपुनि मिलंछ्य दुराचार : छेदावेया स्रीकरणियाचें सिर
ऐसें फर्माण दिधलें निस्टुर : सदैवा स्रीकरणियासि ४२२

तंव राजफर्माण पाळवेया : राजदुतीं धरोनि नेला स्रीकरणिया
नेंतां तेआचें सिर छेदावेया : शेस्रधारी ४२३

सांतु आंतोनि बोलिलीं उतरां : तीं आठवलीं तेआचेआ जिंव्हारा[1]
तिंचि सांगितलीं समग्रां : म्रुत्य समई ४२४

पाहेपां हेआ भग्ताची सासाइ : जें बोलिलें स्रीकरणिया ठाईं
तें तेआचें वचन हिये समई : साच जाह्लें ४२५

ऐसी विचित्रि कथा परिकरी : पाद्री निरोपी तिये अवस्वरीं
तंव उठिला सभे भितुरि : क्रिस्ताव येकु ४२६

## चमत्कार सतरावा

म्हणे तेआ देवभग्तें संसारांतु : आपण वर्तत आसतां जिवंतु
हीं येतुकिंचि अपूर्वें संसारांतु : केलीं काये ? ४२७

अथवा आणियेकें अपुर्वें संसारीं : केलीं काये कवणियें नगरीं
तरि तीं अपुर्वें हिये अवस्परीं : निरोपिजो दातारा ४२८

आइकोनि तेयाचा प्रुस्ट्गविचारु[2] : संतोसु पातला पाद्रि गुरु
म्हणे भला भला विचारु : केलासि तुवां ४२९

तरि तुजिये जिविंचें सर्व आरत[3] : देउ पुरविल गा मनोरथ
आतां परियेसावें सावचित[4] : अपुर्वें तेयाचिं ४३०

पोर्तुगाल देसीं लिस्बोअ नगरासि : हेआ देवभग्ताचेआ पितेयासि
रायाचें दाण[5] होतें तेयासि : येके वरुसीं ४३१

तो निस्कपटी आणी भला मुनुसु : मनीं नाहीं दुभावाचा[6] लवलेसु
म्हणोनि तेणें धरिला विश्वासु : रायाचेआ व्यापारियांचा ४३२

---

१ अन्तःकरणास. २ [ प्रश्नविचारु ]. ३ आवड. ४ सावधान.
५ [ दान ] देणें, कर्ज. ६ संशयाचा.

जें राज्य देणें आपणें द्यावें होतें : तें द्रव्य तेणें दिधलें व्यापारियांथें
तेआचें लिहित सारित[1] आपणेआथें : घेतलें नाहीं ४३३
दाण द्रव्य सरोनियां समस्त : मग आपण राहिला सावचित
फुडां काये वर्तलें तेथ : व्यापारियां वरउनु ४३४
दाणाचि वरुसें गेलेया सरुनु : भग्ताचे बापें तेया पासउनु
आपुलें दाण सारित घेइन म्हणउनु : लिहुनियां ४३५
हिसेबाचीं कागळें[2] घेउनु हातीं : राउळीं निगाला व्यापारियां प्रती
तंव तेहीं आधरिली[3] थोरि अनिति : मुखिर[4] गेले[5] दिधलें नाणें ४३६
तंव रायाचे व्यापारी म्हणती : द्रव्य पातलें नाहीं आमां हस्तीं
म्हणउनि पुनरपि मांडिती : देणें तेया वरि ४३७
रायाचें द्रव्य देईं म्हणउनि : खोळंबिला[6] फेरिकर[7] देउनीं
घेतलेआ द्रव्याचा नेदुनि[8] : वासिलु[9] तेया ४३८
तंव सग्न्याना[10] सांतु आंतोनिसि : तें ग्न्यानीं जाणवलें तेयासि
आपुलेआ मोगाळा[11] पितेयासि : जुगांत[12] आलें म्हणउनि ४३९
फुडां रायाचे व्यापारी हिसेबवंत : तेआचा हिसेबु घेंती जेथ
ते ठाईं पातला अकस्मात : सदैवु भग्तु ४४०
जाउनि चाउडियांतु[13] प्रवेसला : तंव बापाचा अकांतु देखिला
मग काये बोल्ता जाहाला : व्यापारियांथें ४४१
अहो, या मनुशें रायाचें देणें : तुमां हस्तीं आणोनि दिधलें तेणें
अजोनि खैंचे[1] द्यावें नाणें : उरलें याथें ४४२

---

१ पावती. २ [कागदें]. ३ [आदरिली] अवलंबिली. पहा :—**घोर हे उपेक्षा माझी आदरिली काय मुकुंदा।**—रघुनाथ पंडित, गजेंद्रमोक्ष. ४—५ नाकारते झाले. पहा :—**सांव पेद्रु तिनि वेळां तेआसि वोळखना म्हणौनु मुखिर गेला.** —स्टिफन्स. ' दुसरें पुराण, ' अवस्वर ४६ (मथळा). ६ थांबवून धरला. ७ वसूलदार. ८ न देउनी. ९ हिशेब, जमाखर्च. १० [सज्ञाना] अंतर्ज्ञानी. ११ प्रिय. १२ संकट, अरिष्ट. (युग + अंत). १३ कचेरींत. १४ [कैंचें] कुठलें.

येर म्हणती आमां जंव्हळां : सांगैं येणें दिधलें कवणिये वेळां
आणी कवणें देखिलें डोळां : कवणु साखि[1] यासि ४४३
तंव जे जे वेळे जे जे स्थानीं : जें जें नाणें दिधलें निवडुनि
तें तें नाणें सांगितलें नांवाडुनि[2] : सदैवा भग्तें ४४४
आणी तेणें द्रव्य सारिते वेळां : जे जे मनुश्य होते जवळां
तेआं जनांचीं साखि नांवा सकळां : सांगितलि नांवाडोनि ४४५
आगा तुमीं भले रायाचे व्यापारी : आठउ करुनियां आपुलां जिव्हारीं
द्रव्य सारित देउनि झडकरीं : सोडवा याथें ४४६
तंव आपुले जिविंची थोरी गुप्त : तेणें सांगितली देखोनि समस्त
ते रायाचे व्यापारी स्रीकरणीसहित : तठास्त जाहाले ४४७
मग सांतु आंतोनिचेआ पितेयासि : तेआचे द्रव्य सारित देउनि तेयासि
सोडुनि पाठविला मंधिरासि : द्रव्य नाणें नघेतां ४४८
आपुलेआ बापाची सोडवण करुनीं : सदैवु देवभग्तु सांतु आंतोनि
तैसाचि निगाला अद्रुस्ट होउनि : पुणति देखिला नाहीं ४४९
तरि तेआ पुण्य भग्तें येणें परी : हें स्रस्ट अचर्ये केलें संसारीं
दुजें अपुर्व सांगैन या वरि : परियेसैं विप्रा ४५०

## चमत्कार अठरा

फुडां कवणे येके अवस्परीं : पोर्तुगाल लिस्बोव्र नांवें नगरीं
येका मनुशासि तेआं दिवसांतरीं : येकें केला जिवघातु ४५१
मग सांतु आंतोनिचेआ बापावरि : मेळोनि तेआचे द्रुस्ट दुराचारी
तेआ मनुशांचा घातु तेया वरि : स्थापिला तेहीं ४५२
तेणेंचि तो मारिला म्हणउनि : कुडे[3] साखिवाद[4] तेया वरि देउनि
नगर नितिकर्तेआं[5] वरउनि : धरिला तेयासि ४५३

१ [साक्षी]. २ वर्णन करून. ३ खोटे. ४ [साक्षिवाद]. ५ न्यायकर्त्यां.

तेआचे म्हणियारे[1] आणियेक कांहीं : तेहीं धरिले तेचि प्रस्ताईं[2]
घातकी म्हणउनि काराग्रुहीं : रख्यणा[3] केली ४५४

मग राज्यधरीं तेयाची निति करुनि : तेयासि गळा[4] द्यावेया फावे[5] म्हणोनि
मारावेया राज्यफर्माण देउनि : निर्धारु केला ४५'१

सदैवा देवभग्तांचेआ पितेयासि : आणी त्याचेआं म्हणियारेआं शेवकांसि
गळा द्यावेया तेयां सकळांसि : निरोपिलें नितिकर्ते ४५६

मग तेयांसि काराग्रुहिंचे काडुनि : नेंताति गळा द्यावेया लागोनि
काये जाहालें तेया वर्तमानीं : तिये समईं ४५७

येतुकेआ तेआ दिवसा समयांतरीं : पादुवा म्हणिपे येका नगरीं
देवभग्तु आसतां बहुतां दुरीं : आपुला ठाईं ४५८

तंव तेआ लिस्बोआ नगरा पुरांतु : बापासि पडला दुजा अकांतु
तो देवग्न्यानें आपुलेआ मनांतु : जाणितला तेणें ४५९

मारावेया नेंतिल आपुलेआ बापासि : ऐसें तेणें जाणोनियां मानसीं
मुस्तैराचेआ अधिकारिया पासीं : बोलिलें तेणें ४६०

म्हणे स्वामी कांहीं येका कृत्यासि : मज जावेया नगरा परदेसीं
आग्न्या द्यावी जी सेवकासि : येरें दिधला निरोपु ४६१

तंव रात्रिचा देवदुतु येउनु : तेया पादुवा नगरा होउनु
तेणें अंत्राख्य[6] नेला उचलुनु : देवभग्तार्थे ४६२

मग लिस्बोअ नगरीं अवचितु : प्रवेसला सांतु आंतोनियु भग्तु
फुडां काये व्रुतावंतु[7] : वर्तला देखा ४६३

प्रभात समईं येरे दिवसीं : निगोनि नगर नितिकर्तेआं पासीं
आपुलेआ बापाचे सोडवणेसि : विनविता जाहाला ४६४

---

१ सेवक. २ प्रसंगीं. ३ [ रक्षणा ] राखणी. ४ फांसी. ५ पात्र आहे. ६ [ अंतरिक्ष ], आकाशांत. ७ [ वृत्तांत ].

अवधारा हो तुम्हीं नितिकर्ता : हेआं मनुशांसि अपराधा व्रहित[1]
वायांविण कां करिताति घात : निरपराधियांथें ४६५

तेआं बापुडेआं मनुशांचां ठाईं : घातकाचा किंचित अपराधु नाहीं
आणी तेआचे सांगाती सकळई : निरपराधी जाणावे ४६६

निति निवाडु असे तुमां हस्तीं : आणी तुम्हीं भले नितिकर्ते होंती
तरि हेआं बापुडेआंसि अन्यार्थी : नमरा[2] तुम्हीं ४६७

तें वचन आइकोनि नितिकर्तु म्हणे : जें मियां दिधलें निरोपणें
तें मीं नमोडीं नितिचें करणें : सर्वथा जाणैं ४६८

बापा आणी म्हणियारेआंचा प्राणु : राखावेया उपावो न दिसे कवणु
तंव म्रुत्याचेआ फोंडा[3] पासीं निगुनु : देवभग्तु सांतु आंतोनि ४६९

तेया संवें लोकु गेले बहुत : फोंडु खणूं लागले तेथ
तंव देखिलें म्रुतेआचें प्रेत : जिवंत तेहीं ४७०

मग तें फोंडांतुलें प्रेत : जिवंत होउनु उठिलें अवचित
तें देखुनु लोकु तठास्त : जाहाले सकळ ४७१

तंव तेआं बहुतां जणां देखणें : सांतु आंतोनि तेयासि म्हणे
तुज हतिला[4] सांग कवणें : सत्य वचनि ४७२

आतां गळा घावेया नेंती जेयांसि : तेआं प्राणियें मारिला काये तुजसि
हें सत्य सांगैं आपुले वाचेसीं : ऐसें पुसिलें भग्तें ४७३

देवभग्ताचें वचन आइकोनि : म्रुत्य मनुसु बोले मुखवचनीं
हेआं मनुशीं नाहीं मारिला हातुनि : हे निरपराधि जाणावे ४७४

तेआ वरि तेआ देवभग्ता प्रती : रायाचे शेस्त्रधारी म्हणती
तुम्हीं बरवें पुसा जी तेआ प्रती : कवणें हतिला म्हणउनि ४७५

---

१ [विरहित]. २ [न मारा], मागें ओवी ५७ टी. १० पहा. ३ खड्डा (पुरण्याचा). ४ जिवें मारिला.

तंव सांतु आंतोनिन येर कांहीं : तेया पासीं पुसिलें नाहीं
मग बोलता जाहाला काये : शेखधारां पासीं ४७६

अगा अपराधियांचीं पातकां : प्रघट करावेया जनलोका
हेआ कृत्यासि नाहीं आलों देखा : आलों यांचे सोडवणेसि ४७७

बापुडेआं निरपराधियां जनांचा : आलां[1] निर्वाळा[2] करावेया नितिचा
प्रघट करावेया दोसु येरांचा : नाहीं प्रस्तावो मज ४७८

हेआ अचर्यास्तंव ते समस्त : सांतु आंतोनिचेआ बापा सहित
म्रुत्यु निवारोनि गेले चालत : आपापुलां घरीं ४७९

म्रुत्यु मनुशु जा जिवनला[3] : ता पुणति आपुलां फोंडीं रिघाला :
ऐसा व्रुतावंतु तेथें वर्तला : अचर्येवंतु थोरु ४८०

फुडां तो सदैवु सांतु आंतोनि : आला तैसाचि झडकरोनि
आपुलेआ पादुवा नगरा परतुनि : गेला पुणतीं ४८१

तंव फोंडा भोंवते जे होंते नर : तेहीं हें अचर्ये देखोनि थोर
माहा विस्मित होउनि येरां येर : बोल्ती आपणेआ माजि ४८२

म्हणती येवडी ही नवल परी : आमि देखिली नाहीं अद्याप वेरि
ती आजि डोळां देखिली संसारीं : माहा विल्पनाची[4] ४८३

ती सर्व वार्ता लिस्बोव नगरीं : आणी आणियेकां पाटणां पुरीं
फांकोनि गेली लोका भितुरीं : वर्तला अद्भुति ४८४

तेआं तेआं पुरां नगरांचे जनु : परमेस्पराचा उपेगु मानुनु
विविधा परि अर्गी दिउनु : उपेगु[5] मानिती स्वामियाचा ४८५

पाहेपां परमेस्परु येणे प्रकारीं : आपुलेआं भग्तां शरणागतां वरि
स्वाडु[6] होंताये निरांतरीं : तेआंचा भावार्थु देखोनि ४८६

---

१ आलों आहें. २ खात्री. ३ जिवंत झाला. ४ अर्थपूर्णतेची.
५ [ उपयोग ]. ६ संतुष्ट, शुभ.

सांतु आंतोनि पादुवा नगरीं : तेथौनि परतोनि गेलेआवरि
शास्त्रकथना आधिले परी : करुनि तेणें ४८७

शास्त्रद्रुहितां अभाविकांसि : उपशामु देउनु दिवसीं दिवसीं
परमेस्पराचे भग्ती सेवेसि : लाविले तेणें ४८८

बहुतेकि तो नव्हतां मृत्यु : तेआ आधि मागिलेआ कोरेझ्मांतु[1]
जो लोकु मेळविला देवशास्त्रांतु : तेया देवभग्तें ४८९

जिवीं माहा उलासवंतु होउनु : तेआं जनांसि उपशामु करुनु
पुण्यफळाचा पंथु अनदिनु : लाभवी तेया ४९०

## शेवट

मग तें कोरेझ्म सरलेआवरि : तेणें देहप्राचित केलेआ नंतरीं
असग्तु[2] जाहाला सर्व सेरिरीं : सदैव भग्तु ४९१

जिर्न होउनि आंगिचें मौंश[3] रग्त : तेआचे निर्बळ जाहाले पाये हस्त
पिडे व्यापिलें अकुशवंत : शेरिर तेआचें ४९२

फुडां सांतु आंतोनिचें सर्वांग : वेळों वेळां होये सायाभंग[4]
पोलें[5] पडोनि जाहाले चिंब[6] : अकुशपणें ४९३

तंव तेणें जाणितलें मनांतु : आपुलेआ आयुशाचा पुर्न संखेतु[7]
पुरवत गेला संसारांतु : म्हणउनियां ४९४

आपुलेआं दोगां रेलिझिओजां पुण्यसिलां : बोलाउनु घेउनियां जंवळां
निगावेया गेला तेया वेळां : येकांतस्थानीं ४९५

सदैवु भग्तु वर्ततां तिये स्थानीं : अंगिचा तनु तेज सग्ति[8] तुंटुनि
दिनें दिनु जाहाली हारिपणी[9] सर्वांगाची ४९६

१ (quaresmo पोर्तु.) ईस्टरच्या आधीं चाळीस दिवस पाळण्यांत येणारा उपवास (Lent). २ अशक्तु. ३ [मांस]. ४ (छायाभंग ?) ५ गाल (कपोल). ६ चिरमुटलेलें, सुरकुतलेलें. ७ [संकेतु]. ८ [शक्ति]. ९ कृशता, नष्टता.

शेरिर पिडावंत जाह्यलें : म्हणे आतां माजें जिणें कुंठलें
तंव तेणें साक्रामेंत घेतले : इग्रजे ठाईं ४९७
मग आपुलेआं रेलिझिओज जनां पासीं : सांत[1] उंसांव[2] म्हणती जेआ साक्रामेंतासि
ता साक्रामेंतु दिधला तेयासि : अंतिचां वेळां ४९८
करोनि सरलेआ स्वामिणीचे तुस्ति[3] : तियेचेआ सारथिपणा निमितीं
क्रिस्तु स्वामि भेटला खिती : अकस्मात तेया ४९९
मग आपुलें मन स्वस्त करुनु : क्रिस्ता स्वामियापासीं बोलुनु
प्राणु दिधला समर्पुनु : तेयाचां करीं ५००
तंव भग्ताचे कुडी सेरिरीं : वर्नु[4] छाया आधिले परी
नमोडतां मुखकळा समग्रि : तेआ भग्ताची ५०१
जिवंत सारिखी आंगकळा : हालों चालों ये वेळों वेळां
ऐसी अस्टांगें उरलि सकळां : सदैवा भग्ताचि ५०२
तेआ जंवळीं जे होंते नर : तेयासि निह्याळोनि पाहांति तर
न दिसे मृत्यवंताचें शेरिर : देखती जिवंत जैसें ५०३
जैसा येकादा मनुशु जिवंतु : पोउडला[5] दिसे माहा स्वस्तु
तैसेआ देखती तेआचेआ शेरिरधातु : ते रेलिजिओज जन ५०४
तो सदैवु भग्तु पुण्यसिळु : दिपका सारिखा निर्मळु
तैसा सदैवा भग्ताचा आंगढाळु[6] : दिसे प्रझळितु[7] ५०५
तेआचा म्रुत्यदिवसु परियेसीं : जूंर्न[8] मासाचे तरावे दिवसीं
निवर्तोनि गेला मुग्तिप्रवेसीं : सांतु आंतोनियु भग्तु ५०६

---

१–२ ( Santa Uncção पोर्तु. ) अंतकाळचा एक कॅथलिकांचा धर्मविधि. "a sacrament in which the sick in danger of death are anointed by a priest for the health of soul and body, the anointing being accompanied by a set form of words." ३ [ स्तुति ], वर्णविपर्यायाचें एक उदाहरण. ४ वर्ण, रंग. ५ [ पहुडला ]. ६ शरीरशोभा. ७ [प्रज्वलित], सतेज. ८ जून.

क्रिस्तु स्वामि जल्मलेआ संसारीं : बारा सेतें येकतिस वरुसें वेरीं
लोटुनि गेलेआ नंतरीं : निवर्तला तो भग्तु ५०७

तो भग्तु निवर्तला जिये दिवसीं : ते समईं सतिस[1] वरुसें होंतीं तेआसि
येतुके प्रायें[2] तेआ देवभग्तासि : जाहाला मृत्यु ५०८

## निधनोत्तर चमत्कार

ऐसी विचित्रि कथा आइकुनु : उठिला येकु क्रिस्तांव जनु
काये बोले नमस्कारु करुनु : गुरुपासीं ५०९

तेआ भग्ताचें वर्तमान : अपुर्वां आणी तेआचें मरण
जें तुमीं केलें पठण : आमा जंवळां ५१०

ती येतुकी कथना आइकुनी : सनाथु जाहालों माजां मनीं
जो भग्तु गेलेआ निवर्तोनि : काहीं अपुर्वें केलीं तरि ५११

गुरु तुवां कृपा करुनु : आमां सांगा जी अर्थुनु
तें तेआचें वचन आइकुनु : पाद्रि म्हणे तेया ५१२

पण तेआं माजि अपुर्वां थोरां : काहीं येकां बरवीं मुग्तसरां[3]
सांगैन तीं अवधारा : स्रुते तुमीं ५१४

तेआ देवभग्ताचें मरण : स्रुत नकरितां कवणां
मेळोनि रेलिझिओज आपण : तेआ मुस्तैराचे ५१५

सदैवि कुडि पुण्यभरिति : रेलिझिओझीं काडोनि गुप्ति
नेली पादुआ नगराचेआ पंथीं : तेया रेलिझिओझीं ५१६

आपुलेआं येकि इग्रजांतु नेउनि : येरा कवणा येका स्रुतें[4] नकरोनि
भग्ताची कुडि ठेविली स्थापुनि : तिये स्थानीं ५१७

मग तो भग्तु निवर्तलेआ उपरि : देवें तेआ वरउनि निरांतरीं
जीं अपुर्वें केलीं संसारीं : तीं सांगैन तुमां ५१८

---

१ छत्तीस. २ वयांत. ३ प्रमुख. ४ [ श्रुत ], ज्ञात.

तंव तेथ नवल वर्तलें घोर : तेआ नगरिंचे धाकुले कुमर
हिंडोनियां समग्र नगर : हाक देंती थोरि ५१९

भगतु निवर्तला निवर्तला म्हणती : ऐसे धाई[1] दिसां शेब्द देंती
बिदि[2] वाटां जनलोकासि सांगती : देवभग्ताचें मरण ५२०

ऐसे बाळकांचे सब्द आइकुनु : तेआ नगरिंचे सकळइ जनु
हें नवल नवल म्हणउनु : माथे तुकिती ५२१

मग खुण पुरवली लोका मनीं : सदैवु देवभग्तु सांतु आंतोनि
स्वर्गेस्तु जाहाला म्हणउनु : गमलें तेया ५२२

निवर्तलेया तो सांतु आंतोनि : स्वामिया देवें तेया वरउनि
असंख्य अपुर्वे दिने दिनीं : दाविलीं संसारांतु ५२३

तेआं अभिनवां अचर्यां भितुरि : हि अपुर्वे केलीं येणे परी
यां अपुर्वांची किर्ति हिये संसारी : सुस्टी अनुपमि ५२४

म्हणिपे कवणाइ व्यादिंचे नर : केती पिडावंत रेंजलेइ[3] तर
तें आपुले दोस होउनि कोंफेसार : तियेचि वेळां ५२५

हेआ भग्ताचेआ सेपुलक्रा[4] स्थानीं : ते व्यादिस्त पावतां निगोनीं
तेआंचेआ सर्व व्यादी पिडा हरुनि : प्रणाम होंती ५२६

ऐसीं हीं अपुर्वे प्रतिदिनु : लोक प्रसिध केलीं देखुनु
भग्तासि सासायेवंतु[5] मानुनु : सकळां जनीं ५२७

तो भग्तु निवर्तलेआ वरुसासि : जाहालि येकु सहस्त्र वरुसें दोनिसीं
आणी तेआचेआ बतिसावेआ वरुसीं : ग्रेगोरियु नांवें भग्तु येकु ५२८

तो नवा सुमु[6] पोंतिफिसि[7] : एस्पोलेतु नावें तेया नगरासि
वर्तुनि आसतां तेआं वरुसीं : पोंतिफिसि तो ५२९

१ [दहाही]. २ गल्ली (कानडी). ३ गांजलेही. ४ (Sepultura, पोर्तु.) प्रेताचा खड्डा. ५ साक्षात्कारी. ६–७ (Summo Pontifice. पोर्तु.) मुख्य बिशप.

ता देवभग्तासि कानोनिजार[1] करोनि : येरां भग्तांचां ग्रंथीं पुराणीं
तेयाची नामकिर्ति लिहणी : करा म्हणितलें ५३०

हेआ सदैवा देवभग्तासि : कानोनिझार केलेआ तेआ दिवसीं
पोर्तुगाल राज्य नगरदेसीं : लिस्बोअ नामें नगरीं ५३१

येक अपुर्व वर्तलेआ वरउनि : स्वर्गा संसारा तेयाचि दिनीं
कानोनिजासांवाची पर्वणि : केली ऐसें दिसे ५३२

तेआ नगरिंचेआ घांटा तेआं वेळां : आपें आप वाजिनलिया सकळा
वादे[2] देऊं लागलेआ प्रभळा[3] : आपुलेआं नादाचें ५३३

ते घांट नाद कवणे प्रस्ताईं : होंताति ऐसें नपडतां ठाईं
स्त्रिया पुरुस कुटंब सकळइ : आणी लाहान थोर ५३४

आपापुलेआं मंधिरांतुनु : समग्र लोकु बाहिर निगुनु
हरिकु[4] उछ्यावो[5] करिती गहनु : माहा संभ्रमें[6] ५३५

या परी लिस्बोअ नगराचा लोकु : करोनि माहा उछ्यावो हरिकु
प्रेमभरित सकळैकु : जाहाला संतोसि ५३६

मग ठाउकें जाहालें तेआंसि : तेआं घांटां नादांचे दिवसीं
देव भग्ता सांतु आंतोनिसि : कानोनिजार केला म्हणोनि ५३७

ऐसी विचित्रि कथना मनोहरि : पाद्रिन निरोपिली सविस्तरि
ती परियेसावी स्त्रिवणद्वारीं[7] : सावधान देउनु ५३८

या वरिल कथेची वित्पति[8] : पाद्रि निरोपिल स्रुतेआं प्रती
ती परियेसावी स्त्रिवण स्रुतीं : येक चित देउनि ५३९

**येथोनि सांतु आंतोनिची कथा समाप्त**

१ (Canonizar. पोर्तु.) साधुत्वपदवी देणे. २ [वाद्यें]. ३ [प्रबळा]. ४ हर्ष. ५ उत्सव. ६ प्रेमानें. ७ [श्रवणद्वारीं], कानीं. ८ विवरण, अर्थज्ञान.

# कठीण शब्दांची सूचिका

( आंकडे ओव्यांचे आहेत. या ओव्यांखालीं टीपांत
शब्दांचें स्पष्टीकरण सांपडेल. )